# नवभारत

वर्ष ९ वें ] मार्च १९५६ [ अंक ६ वा



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका








सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष नववें — **नवभारत** — मार्च

अंक सहावा — १९५६

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत-श्री. हरि कृष्ण मोहनी-प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ — सहामाही रु. ५ — अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )






# 'नवभारत' मासिक, मार्च १९५६

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे-- का. सं. ]

**डॉ. प्र. न. जोशी** एम्. ए. पीएच्. डी. – पुणें येथील नूतन मराठी विद्यालय हायस्कूलचे उपप्रमुख.

**प्रा. वी. डी. महाजन** – औरंगाबाद येथील ' मिलिन्द-महाविद्यालया'मध्यें अर्थशास्त्र व राजकारण यांचे प्राध्यापक.

**श्री. मा. गो. काटकर** – बी. ए. एस्.टी. सी. – सोलापूर येथील ' विद्याविकास ' हाय् स्कूलचे संस्थापक. ' जयजयवन्ती ' या काव्यसंग्रहाचे लेखक.

**श्री. अ. ज. करंदीकर ( पुणें )** – ' दाशराज्ञयुद्ध ', ' महायुद्धाचा इतिहास ', ' लढाऊ राजकारण ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**प्रा. मु. गो. देशपांडे** – नाशिक येथील हं. प्रा. ठा. कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक.

**श्री. दत्ता कदम** – यंदा मुंबई विद्यापीठाच्या एम्. ए. ला रुईया कॉलेजमधून बसणार आहेत. ' ७८ कविता ' हा कवितासंग्रह प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

**डॉ. य. कृ. सोवनी** – वाङ्मय-आयुर्विद्याविशारद ( टि. म. वि. ) – मुंबई येथील ' संयुक्तमहाराष्ट्र-परिषदे'चे कार्यवाह. ' संयुक्त महाराष्ट्राची माहिती ' या पुस्तकाचे लेखक.

---

* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.
* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.
* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

अनुक्रमणिका

डॉ. प्र. न. जोशी

# संतांचा साम्यवाद

## साम्यवादाचा मथितार्थ

महाराष्ट्रीय संतांच्या कामगिरीचें वर्णन अनेक दृष्टींनीं आजपर्यंत झालें आहे. संत हे साक्षात्कारवादी असून ब्रह्मसुखांत दंग होऊन जाणारे होते, आत्म-सुखाचा अनुभव घेतल्यानंतर आपल्याबरोबर इतरे जनांनाहि संतर्पण घडवून तृप्त करण्यासाठीं संतांनीं लोककल्याण साधिलें, परचक्रापासून समाजाचें व राष्ट्राचें रक्षण व्हावें म्हणून संतांनीं चळवळ सुरू केली, संत हे वृत्तीनें मूलतः कलावंत वा कवीच होत, काव्य-निर्मितींत स्वानंद मानणें याच हेतूनें ते प्रेरित झालेले होते, दीन, दरिद्री शेतकऱ्यांना विठ्ठलभक्तीच्या गुंगींत जखडून टाकून त्यांना निष्क्रिय बनविणारे संत हे जमीनदारांचे व अमीरउमरावांचे हस्तक होते, इत्यादि मतप्रवाह आपल्या चांगल्याच परिचयाचे आहेत. ‘संतांचा साम्यवाद’ या विषयाच्या अनुरोधानें वरीलप्रमाणेंच एखाद्या नव्या दृष्टीनें संतकार्याचें समालोचन करावें व आज सर्वत्र पसरत असलेला व लोकप्रिय होत असलेला साम्यवादहि महाराष्ट्रीय संतांनीं प्रतिपादन केला असें सांगावें म्हणून हा लेख नाहीं.

लेखाच्या हेतूचें स्पष्टीकरण व्हावें म्हणून ‘साम्य-वाद’ या शब्दाचा अर्थ या ठिकाणीं अगोदर स्पष्ट केला पाहिजे. साम्यवाद म्हणजे समतावाद. सर्व प्राणि-मात्र एकाच अंशापासून निर्माण झालेले असून त्यांच्यांत केवळ जन्मामुळें एक कनिष्ठ व दुसरा श्रेष्ठ असा भाव असूंच शकत नाहीं. कोणी एक मनुष्य अमक्या जातींत जन्मास आला म्हणून त्यानें अमकें कृत्य करूंच नये, अमका विचार बोलूंच नये, अमक शास्त्रें ऐकूंच नये, अशा प्रकारचे निर्बंध साम्यवादांत राहूंच शकत नाहींत. सोयीसाठीं माणसामाणसांच्या जाती म्हणजे वर्ग पाडण्यास हरकत नाहीं; पण जन्मा-वरूनच जातींची निर्मिति ज्या काळीं स्थिर झाली त्या काळापासून सामाजिक विषमतेनें आपलें उग्र स्वरूप प्रकट करण्यास प्रारंभ केला. माणसाच्या कृत्यावरून वा कर्मावरून जात ठरली तर त्याचा अनर्थ होत नाहीं पण जातीवरून एखाद्यास एखादें कर्म हटकून करा-वयास लावणें यांत मात्र अनर्थाचीं बीजें रुजत राहतात. तेव्हां माणसामाणसांत तरी जन्मामुळें विषमता नसावी हें साम्यवादाचें प्रमुख तत्त्व मानलें जातें. गरीब-श्रीमत, सुशिक्षित-अडाणी, अधिकारी-सेवक, पुढार-लेले-मागासलेले याप्रमाणें विषमता सर्वत्र आजहि दिसून येत असली तरी केवळ जन्म अमक्या कुळांत वा जातींत झाला म्हणूनच जातिनिर्णय ठरविण्याच्या पद्धतीमुळें समाजांतील तीनचतुर्थांश वर्ग कित्येक शतकें अतृप्त राहिला, मूक राहिला, कष्टी राहिला. या उपेक्षित, दुर्लक्षित, दलित समाजाला हातीं धरून त्यासहि सामुदायिक जीवनांतील सर्वोत्तम सुखाचे वांटेकरी होऊं देणें हा साम्यवादाचा मथितार्थ आहे. या दृष्टीनें महाराष्ट्रीय संतांनीं काय केलें ? एका बाजूला सर्व जग एकाच अव्यक्त बीजापासून निर्माण झालेलें असल्यामुळें एक श्रेष्ठ व एक कनिष्ठ असा भावच नाहीं असें सांगणारें तत्त्वज्ञान; तर दुसऱ्या बाजूस हा ब्राह्मण, हा वैश्य, हा शूद्र, याला अमुक अमुक अधिकार, अमुक अमुक याची वांटणी, हा ब्रह्मदेवाचें मुख, याची उत्पत्ति पायापासून, हा उंच हा नीच, हा शुद्ध हा चांडाळ, हा पवित्र हा पापकर्मी अशा प्रकारच्या भेदांनीं बुरसटलेलें आणि विकृत झालेलें सामाजिक जीवन ! अस्पृश्याची सांवलीहि माणसांना दूषित वाटूं लागली. मध्ययुगीन काळांत जीवनांतील सवांत मोठें मानलें गेलेलें वैभव निःसंशय आध्यात्मिक स्वरूपाचें होतें. एका बाजूस या सुखाचा अनुभव समाजांतील कांहीं विशिष्ट वर्गच घेत राहिला. आणि दुसऱ्या बाजूस पसरलेला अज्ञानी, दुःखी, कष्टी, पीडित, भुकेलेला असा जनसागर ! समाजांतील या दोन टोकांतील अंतर कमी करण्याचे प्रयत्न संतांनीं केले काय ? संत साक्षात्कारवादी असोत वा लोकांच्या वा

राष्ट्राच्या उद्धारार्थ झटणारे पुढारी असोत, सामाजिक साम्यवादाबद्दल त्यांनीं कांहीं उद्गार काढले आहेत काय ? साम्यवादाचा पुरस्कार कोणा संतानें अट्टहासानें केला आहे काय ? जन्मावरून ठरलेल्या जातिभेदाविरुद्ध कोणी बंडाचा झेंडा उभारून चळवळ केली आहे काय ? तशा प्रकारचे प्रचारक संत होते काय ? – यांसारख्या प्रश्नांचीं उत्तरें कांहीं थोड्या प्रमाणांत मिळतात कीं काय तें पाहूं.

या दृष्टीनें संतांच्या चरित्राची व वाङ्मयाची पाहणी केल्यास अनक मनोरंजक व उद्बोधक गोष्टी नव्यानें ध्यानीं येऊं लागतात. ' स्वान्तःसुखाय ' अशा प्रकारचें ब्रह्मसुख भोगल्यानंतर तेंच सुख इतरेजनांना मिळावें अशी तीव्र इच्छा संतांच्या मनांत होतीच आणि मग त्या प्रकारच्या सुखाचें वर्णन इतरेजनांच्या भाषेंत करणें हें क्रमप्राप्तच होतें. येथून बंडाला प्रारंभ आहे. संस्कृत भाषेंतच परमार्थ-विचार सांगावा व तो त्रैवर्णिकांनाच उपयोगी व्हावा असा जेथें आग्रह तेथें अर्थातच प्राकृत आणि अपभ्रंश–भाषेंत तत्त्वज्ञानाचा फुलोरा फुलला आणि त्याच्या अननुभूतपूर्ण अशा सेवनानें स्त्रीशूद्रादिक संतुष्ट झाल्याचा एक विलक्षण चमत्कार संतचळवळींत दिसून येतो. परमेश्वराच्या द्वाराचीं कवाडें युगानुयुगें बंद होतीं; पण मध्ययुगीन काळांत त्याचें दर्शन सर्वांना सुलभ झालें, सर्वांना त्याच्याशीं सलगीनें बोलतां येऊं लागलें. भगवद्गीतेनें ही सवलत थोड्या अस्पष्ट स्वरूपांत पुढें केली आणि ज्ञानेश्वरांनीं तिचा भावार्थ स्पष्ट रीतीनें विवरून सांगितला. भक्तीच्या प्रान्तात जे जे येऊन दाखल झाले ते ते मग स्त्रीशूद्रादिक असोत किंवा पापकर्मी असोत ते मलाच येऊन मिळतात ही साम्य-बुद्धि स्वत: भगवंतांनींच आपल्या मुखानें प्रकट केल्यानंतर ज्ञानेश्वर त्याचा खुलासा वारंवार करीत असतांना दिसतात. ज्ञानदेवांना समाजानें कोणती वागणुक दिली होती, ज्ञानेश्वरादि भावंडें चातुर्वर्ण्याच्या विरुद्ध प्रत्यक्ष नसतांना सुद्धां त्यांच्या शिकवणुकीचा परिणाम कसा झाला या सर्व प्रकारांची चिकित्सा ज्ञानदेवांच्या काळीं सामाजिक विषमता पराकोटीला पोंचली होती हें ध्यानांत ठेवून करतां येण्यासारखी आहे.

## ' जातीं व्यक्ति पडे बिंदुलें '

गीतेंतील ९ व्या अध्यायाच्या ३२ व्या श्लोकावर टीका करीत असतांना ज्ञानदेव सांगतातः–

' म्हणौनि कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्यजही व्हावें ।<br>
वरि देहाचेंनि नांवें । पशूचेंही लाभो ॥ ' – ९ · ४४१.

' उत्तम कुळ नसलें तरी चालेल, आणि जन्मानें अंत्यज असला तरी हरकत नाहीं, देह पशूचा असला म्हणून काय झालें ? ' एक भक्ति असली कीं माणसामाणसांत समानता असते. अगदीं खालच्या जातींत जन्म असेल, पण माझेकडे चित्त असेल तर तो कृतार्थच समजावा असा भावार्थ ज्ञानदेवांनीं येथून पुढल्या ओव्यांतून स्पष्टपणें निवेदन केला आहे :

' अगा नांव घेतां वोखटीं । जें आघवेय अधमांचिये शेवटीं ।<br>
तिये पापयोनीही किरीटी । जन्मले ज ॥<br>
ते पापयोनी मूढ । मूर्ख ऐसे ते दगड ।<br>
परि माझे पायीं दृढ । सर्वभावें ॥ ' – ९·४४३–४४४

पण माझ्या ठायीं ज्यांची भक्ति जडली आहे त्यांचें पापकर्म वा त्यांची जाति पाहूंच नये.

' म्हणोनि जाति कुळवर्ण । हें आघवेंचि गा अकारण ।<br>
एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ॥ ' – ९·४५६

मला जोंपर्यंत मिळाल्या नाहींत तोंपर्यंत फार तर वेगवेगळ्या जाती दिसतील; परंतु एकदां मला येऊन भिडल्यानंतर भेदाभेद उरतच नाहीं.

' तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ।<br>
जाति तंवचि वेगळालिया । जंव न पावती मातें ॥ ' ९·४६०<br>
मग जाती व्यक्ति पडे बिंदुलें । जेव्हां भाव होती मज मीनले ।<br>
जैसे लवणकण घातले । सागरामाजी ॥ ' – ९·४६१

कोणत्याहि जातींत जन्मावें व भक्तिभावानें माझें स्मरण केल्यास जीवांचें कल्याणच होईल असा निष्कर्ष ज्ञानदेवांच्या विवेचनाचा आहे.

' आणि भलतिया जातीं जन्मावें । मग भजिजे कां विरोधावें ।<br>
परि भक्त कां वैरिया व्हावें । माझियाचि ॥ ' – ९·४७२<br>
यालागीं पापयोनिहि अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना ।<br>
मातें भजतां सदनां । माझिया येती ॥ ' – ९·४७४.

निदान भक्तीच्या प्रान्तांत तरी जातिभेद उरत नाहीं. स्त्रीशूद्रादिकांना व पापकर्मीयांना परमेश्वराचा मार्ग










मोकळा आहे ही घोषणाच क्रांतिकारक होती. समाजांतील अनेक थरांना यामुळें स्फुरण चढलें आणि ज्ञानदेवांच्या काळांत प्रत्येक जातींत एक एक संत निर्माण झाला. कुटुंबांत एखादा पोरगा कर्तृत्ववान् निपजला कीं सबंध कुटुंबच्या कुटुंब वर येतें. त्याचप्रमाणें परमेश्वराच्या दरबारांत मानाचें स्थान मिळवणारा संत आपल्या जातीचा उद्धार करता झाला. तेवढ्या तरी प्रांतांत आजवर चालत आलेली विषमता संपली. नामदेव शिंपी, दासी जनी, गोरा कुंभार, सावता माळी, सेना न्हावी, नरहरी सोनार, चोखा मेळा इत्यादिकांचें वाङ्मय या दृष्टीनें वाचण्यासारखें आहे. परंपरेनें चालत आलेला प्रस्थापित धर्म मोठा चमत्कारिक व संकुचित होता. महारादिकांना जवळ देखील उभे करूं नये असें तत्त्वज्ञान आकारास येत असतांना व त्याप्रमाणें शेकडों वर्षे प्रत्यक्ष वागणूक मिळत असतांना संतांनीं या प्रकारच्या साम्यवादाचा पुरस्कार करण्यास आरंभ केला.

## साम्यवादाची सोनेरी पताका

ज्ञानदेवांच्या काळांतच चोखामेळा महार म्हणून त्याची कितीतरी हेटाळणी झाली. ब्राह्मणादिकांनीं त्याचा छळ केला, त्याचेवर नाना प्रकारचे आळ घेतले, त्याला मारहाण केली. आणि हा सर्व प्रकार कशासाठीं ? तर अस्पृश्य मनुष्य भक्तीच्या प्रान्तांत येऊं पाहतो हें मोठें विपरीत वाटलें त्यावेळीं !

चोखा महारानें करुणवाणीनें एके प्रसंगीं विनवणी केली आहे :–

‘ धांव घाली विठू आतां चालूं नको मंद ।
बडवे मज मारिती ऐसा कांहीं अपराध ॥
विठोबाचा हार तुझे कंठीं कैसा आला ।
शिव्या देती महारा म्हणती देव बाटवीला ॥
अहो जी महाराज, तुमचे द्वारींचा कुतरा ।
नका जी मोकलूं, चक्रपाणी जिमेदारा ॥
जोडोनिया कर चोखा विनवितो देवा ।
बोलिलों उत्तरें परि राग नसावा ॥ ’

आणखी एका अभंगांत हीच सामाजिक तक्रार त्यानें स्पष्ट तऱ्हेनें मांडली आहे.

‘ याती हीन माझी देवा । कैसी घडे तुझी सेवा ।
मज दूर दूर हो म्हणती । तुज भेटूं कवण्या रीतीं ।
माझा लागताचि कर । सिंतोडा, घेताती करार ।
माझ्या गोविंदा गोपाळा । करुणा भाकी चोखामेळा ॥ ’

चोखोबाचा मुलगा कर्ममेळा हा ताज्या तरण्या रक्ताचा महार संत या बाबतींत थोडा चिडलेलाच दिसतो. परमेश्वरास या जन्मजात विषमतेचा जाब कठोर शब्दांनीं त्यानें विचारलेला आहे :

‘ आमुची केली हीन याती ।
तुज कां न कळे श्रीपती ॥
जन्म गेला उष्टें खाता ।
लाज न तुमच्या चित्ता ॥ ’

आणखी एके ठिकाणीं तर कर्ममेळ्यानें व्यावहारिक सुखाच्या भूमिकेवरून विषमतेची चौकशी केली आहे :

‘ तुमच्या संगतीचें काय सुख आम्हां ।
तुम्हां मेघश्यामा न कळे कांहीं ॥
हीनत्व आम्हांसी हीनत्व आम्हांसी ।
हीनत्व आम्हांसी देवराया ॥
गोड कधीं न मिळेचि अन्न ।
सदा लाजिरवाणें जगामध्यें ॥
तुम्हांसी आनंद सुखाचा सोहळा ।
आमुचे कपाळा वोखटपण ॥
चोखियाचा म्हणे कर्ममेळा देवा ।
हाचि आमुचा ठेवा भागाभाग ॥ ’

महाराचा विटाळ सर्वांना होऊं लागला, त्याची संगत, त्याची सावली सर्वांना बाधूं लागली तेव्हां हा विटाळ आहे तरी काय ? कोठून आलें हें विटाळाचें प्रकरण ? सर्व एकाच अव्यक्ताचा विस्तार म्हणतात तर एक सोवळें व एक ओवळें हा भेद कोठून आला ? – असे प्रश्न चोखोबाच्या मनांत निर्माण होणारच. ‘ एक बिंदुसें विश्व रच्या है, को बाह्मन को शूद्रा ’ असा प्रश्न पुढें कबीरानें रोकठोकपणें उपस्थित केलेला आहे. चोखा महारानें तर या विटाळाचें तत्त्वज्ञानच उभें केलें आहे. असेल तर सर्वच ओवळें किंवा सोवळें आहे. एक ओवळें व एक सोवळें हें संभवणारच नाहीं.

‘ पंच ही भूतांचा एकचि विटाळ ।
अवघाचि मेळ जगीं नांदे ।
तेथें तो सोवळा ओवळा तो कोण ।
विटाळाचें कारण देह मूळ ।
आदि अंतीं अवघा विटाळ सांचला ।
सोंवळा झाला कोण न कळे ।










चोखा म्हणे मज नवल वाटतें ।
विटाळापरतें आहे कोण ? '

सोवळें-ओवळें हें ज्याच्या त्याच्या पाहण्यावर अवलंबून असून सोवळया-ओवळया पलीकडचा देव मी पाहिला असें एके ठिकाणीं चोखोबा सांगतात :

' नीचाचे संगतीं देव विटाळला ।
पाणिये प्रक्षाळोनि सोंवळा केला ।
मुळींच सोवळा, कोठे तो ओवळा ।
पाहतां पाहणें डोळा जयापरी ।
सोंवळयाचे ठायीं सोवळा आहे ।
ओवळयाचे ठायीं ओवळा कां न राहे ?
चोखा म्हणे देव दोहींच्या वेगळा ॥
तोचि म्यां देखिला दृष्टिभरी ॥ '

चोखा महाराचे विटाळावरील अभंग फारच श्रेष्ठ दर्जाचे आहेत. त्यांची तात्त्विक भूमिका एवढी तर्कशुद्ध आहे कीं साम्यवादाचा भरभक्कम पाया संतांनीं कोणत्या बाबतींत उभारला या गोष्टीचा निर्णय येथें व्हावा. जन्मजात जाति ही संतांनीं प्रमाण मानली नाहीं. चोखा अंत्यज जातींत जन्मला; पण कर्मानें तो एवढा मोठा झाला कीं त्याच्या पायावर ब्राह्मणानेंहि डोकें ठेवावें. चोखा वरून ' डोंगा ' असला तरी त्याच्या मनांतील भाव मात्र शुद्ध होता, आणि या शुद्ध भावामुळेंच मानवी जीवितास सौंदर्य प्राप्त झालें आहे. बंका हा चोखोबाचा मेहुणा. त्यानें एके ठिकाणीं चोखोबाचें महत्त्व उत्तम रीतीनें वर्णन केलें आहे :

' चोखा चोखट निर्मळ । तयां अंगीं नाहीं मळ ।
चोखा सुखाचा सागर । चोखा भक्तीचा आगर ।
चोखा प्रेमाची माउली । चोखा कृपेची सावली ।
चोखा मनानें मोहन । बंका घाली लोटांगण । '

चोखा महाराचें हें आध्यात्मिक वैभव म्हणज संतांनीं पुरस्कारलेल्या साम्यवादाची सोनेरी पताकाच होय.

चोखा जातीनें महार म्हणून हीन योनीमधील. तर कान्होपात्रा बोलून चालून पापकर्मांत रुतलेली नायकीण. पण पतितपावनाच्या दारीं तिचें लक्ष लागल्याबरोबर ती इतर संतांच्या मालिकेंत जाऊन स्थिर झाली. ती स्वतःच एके ठिकाणीं म्हणते,

' पतित तूं पावना, म्हणवीसी नारायणा ।
तरी सांभाळी वचन, ब्रीद बागवीस जाण ।
याती शुद्ध नाहीं भाव, दुष्ट आचरण स्वभाव ।
मुखीं नाम नाहीं । कान्होपात्रा शरण पायीं ॥
दीन पतित अन्यायी । शरण आल्ये विठाबाई ।
मी तों आहे यातीहीन । न कळे कांहीं आचरण ।
मज अधिकार नाहीं । भेटी देई विठाबाई ।
ठाव देई चरणापाशीं । तुझी कान्होपात्रा दासी ॥ '

आणि कान्होपात्रेच्या या प्रार्थनेचा उपयोग होऊन तिच पापकर्म धुऊन निघालें. परमेश्वराच्या दरबारांत तिलाहि मानाचें स्थान प्राप्त झालें.

## ' जातीकुळ नाहीं तयासी प्रमाण '

याप्रमाणें केवळ जन्मामुळें एखाद्यास समाजापासून दूर राहावें लागतें, हा विचारच संतांच्या साम्यवादांत उरला नाहीं. त्यांनीं तत्त्वप्रचारहि याच मार्गानें केला व त्याप्रमाणें कांहीं हीनयाती संतांना श्रेष्ठ प्रकारचें आध्यात्मिक सुख प्राप्तहि झालें. तुकारामबोवांनीं तर ब्राह्मण कोण आणि शूद्र कोण याचा निर्वाळा त्या त्या कर्मावरूनच दिला आहे :

' जिहीं म्हणविलें हरिचे अंकित ।
जातीचे ते होत कोण तरी ॥
जातीकुळ नाहीं तयासी प्रमाण ।
अनन्या अनन्य तुका म्हणे ॥ '

याप्रमाणें हरीचे दास जातिभेदातीत असतात असें सांगून बोवा एके ठिकाणीं म्हणतात --

' महारासी शिवे, कोपे तो ब्राह्मण नव्हे
तया प्रायश्चित्त कांहीं, देहत्याग करितां नाहीं ।
नातळे चांडाळ त्याचा अंतरीं विटाळ ।
ज्याचा संग चित्तीं तुका म्हणे तो ते याती ॥ '

म्हणजे आपली जाति आपलें कर्म ठरवितें, जन्म नाहीं, असेंच तुकोबांना सांगावयाचें आहे. 'उत्तम कुळीं जन्म क्रिया अमंगळ' असेल तर कांहीं उपयोग नाहीं.

' जातीचा ब्राह्मण न करितां संध्यास्नान ।
तो एक नांवाचा ब्राह्मण होय हीनाहूनी हीन ॥ '

एकदां परमेश्वराचें नामस्मरण केलें कीं हरिभक्त ही एकच जाति उरते असें सांगून हीन यातींत जन्मास आलेल्यांची नामावळीच एके ठिकाणीं तुकोबांनीं दिली आहे :

' पवित्र तें कुळ पावन तो देश
जेथें हरिचे दास जन्म घेती ।

कर्मधर्म त्याचा झाला नारायण
त्याचेनि पावन तिन्ही लोक ।
वर्ण अभिमानें कोण झाले पावन
ऐसें द्या सांगून मजपाशीं ।
अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें
तयाचीं पुराणें भाट झालीं ।
वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार
धागा हा चांभार रोहीदास ।
कबीर मोमीन लतिफ मुसलमान
सेना न्हावी जाण विष्णुदास ।
कान्होपात्रा खोदु पिंजारी तो दादु
भजनीं अभेदू हरिचे पायीं ।
चोखामेळा बंका जातीचे महार
त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ।
नामयाची जनी कोण तिचा भाव
जेवी पंढरीराव तिये सवें ।
मैराळ जनक कोण कुळ त्याचें
महिमान तयाचें काय सांगो ?
यातायातीं धर्म नाहीं विष्णुदासा
निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ।
तुका म्हणे तुम्ही विचारावें ग्रंथीं ।
तरिले पतित नेणों किती ॥ '

आणि एकदां ही समानतेची भूमिका पत्करल्यानंतर भक्तीच्या वा परमार्थाच्या प्रान्तांत तरी जन्मजात जातिभेदामुळें निर्माण झालेली विषमता संपली. ' अवघीं भूतें साम्यां आलीं ' अशी अनुभूति तुकारामास येऊं लागली. परमेश्वराच्या दारांत कोणाचीहि मिरासदारी कवळ जन्मावर आधारलेल्या श्रेष्ठ-कनिष्ठत्वावर अवलंबून नाहीं हाच उद्घोष मराठी संतांनीं वारंवार केलेला आहे. सामान्यतः आपली समजूत अशी कीं, पुरुष हा प्रगतिशील व स्त्री मात्र सनातनवृत्तीला चिकटून राहणारी. पण संत कवयित्री बहिणाबाई हिनें ब्राह्मणधर्माचें विवेचन केलें आहे तें वाचून तर्कप्रवण पुरुषानेंहि चकित व्हावें अशी त्याची योग्यता आहे. बहिणाबाईच्या मतें केवळ जीव धारण करणारा तो ब्राह्मण नव्हे. कारण पशुपक्षी, चांडाळ यांत सारखाच जीव असतो. देहत्व ही पण ब्राह्मण्याची खूण नाहीं. ब्राह्मण हा वर्णातीत आहे. अमुक एका जातींत जन्म झाला म्हणूनहि तो ब्राह्मण नाहीं, पंडितगिरी एखाद्यानें केली म्हणजे तो ब्राह्मण झाला असें नव्हे. असें वारंवार सांगून तिनें शेवटीं निर्णय दिला आहे कीं ' ब्रह्म जाणे तोचि ब्राह्मण बोलिजे ' आणि हें ब्रह्म कोणत्याहि जातींतील माणसानें जाणलें कीं तो ब्राह्मण झाला असा मोठा क्रांतिकारी विचार बहिणाबाईनें विस्तारानें सांगितलेला आहे. जन्मानें सर्वजण समान-भूमिकेवरच असून पुढें आपल्या कर्मानें त्याचें त्याचें महत्त्व ठरत राहतें हा साम्यवादाचा मुख्य सिद्धान्त संतांनीं अनेक वेळां उदाहरणें देऊन निवेदिला आहे.

### अध्यात्माकडून ऐहिकतेकडे

जातिभेद मोडण्यासाठींच एखादें मंडळ स्थापावें, प्रचार करावा, व्याख्यानें द्यावींत, सहभोजनें करावींत, मिश्रविवाह सरसहा सुरू व्हावेत, मंदिरप्रवेशासाठीं उपोषणें करावींत असा आधुनिक प्रचाराचा देखावा संतचळवळींत शोधणें अर्थातच अनुचित होणार आहे, किंवा असेंहि म्हणतां येणार नाहीं कीं या एकाच ध्येयानें प्रेरित होऊन संतांनीं जातिभेद अमान्य केला व साम्यवादाच्या पुरस्कारासाठीं ते सिद्ध झाले. ईश्वरप्राप्ति करून घेणें व इतरेजनांनाहि तेंच सुख प्राप्त करून देणें हाच त्यांच्या चळवळींचा मुख्य भाग होता. पण या ध्येयसिद्धीसाठीं जातिभेद आड आला, अस्पृश्यत्व आड आलें तर साधु-संतांनीं त्याविरुद्ध परंपरेस व प्रस्थापित धर्माच्या रूढीस सोडून क्रांतिकारक विचार बोलून दाखविले व प्रसंगीं आचरणहि केलें. चातुर्वर्ण्याविरुद्ध कडाक्यानें कोणी प्रहार केले नाहींत. पण भक्तीच्या क्षेत्रांत त्याचा उगाच बडेजावहि माजवून ठेवला नाहीं. परमेश्वराचीं लेकरें असणारीं सर्व माणसें एकाच समान भूमिकेवर असून त्यांच्यांत भेदभाव करतांच येणार नाहीं हें मुख्य सूत्र संतांच्या साम्यवादाचें होतें.

या ठिकाणीं आणखी एका प्रश्नाचा विचार करावयास पाहिजे. संतांनीं साम्यवादाचा-समतावादाचा पुरस्कार केला, जातिभेदाचीं सर्व बंधनें शिथिल केलीं, अस्पृश्यता मानली नाहीं या सर्व गोष्टी खऱ्या; पण हा सर्व आध्यात्मिक साम्यवाद होता. जातिभेद भक्तीच्या क्षेत्रांतून हद्दपार झाला, परमेश्वराच्या द्वारांत उच्चनीचता संपली. पण समाजाच्या व्यावहारिक जीवनांत काय फरक झाला ? सामाजिक साम्यवाद निर्माण होण्यासाठीं कोण्या संतानें चळवळ केली ? परमेश्वराच्या दारांत अस्पृश्य








थोर असेलहि पण त्याच्याच गांवांत तो अस्पृश्यच होता ना ? एक आध्यात्मिक क्षेत्र सोडलें तर इतर व्यावहारिक किंवा ऐहिक बाबतींतील विषमता जी खरी दूर व्हावयास पाहिजे ती मराठी संतांनीं दूर केली काय ? – या एका महत्त्वाच्या आक्षेपाचा थोडक्यांत परामर्श घ्यावयास पाहिजे.

एक गोष्ट पहिल्यानें ध्यानांत घ्यावयास पाहिजे कीं ज्याला आपण व्यावहारिक वा ऐहिक जीवन म्हणतों तें संतांच्या काळीं कोणत्या अर्थानें होतें ? पारमार्थिक वा आध्यात्मिक जीवन हाच एक प्रमुख असा भाग होता. बाकी सर्व जीवन जणुं शून्यवत् बनून राहिलें होतें. सहस्रमुखांनीं विस्तारलेल्या आजच्या ऐहिक वैभवाचें स्वप्नहि मध्ययुगीन लोकांना नव्हतें. थोडाफार तरवारीच्या जोरावर पराक्रम करावा आणि आध्यात्मिक सुखाची भूक भागवावी याच काय त्या जीवनाच्या दोन प्रमुख बाजू होत्या. यांखेरीज जी जी व्यावहारिक जीवनाची बाजू होती तींत संतांच्या साम्यवादाचें, आध्यात्मिक समतावादाचें प्रतिबिंब उमटलें होतें काय ? व्यावहारिक जीवनांत सर्वत्र समानता दिसून येत होती काय ? संतांनींहि व्यावहारिक साम्यवादाचा प्रचार केला काय ? – या प्रश्नांचीं उत्तरें पाहणें मोठें मनोरंजक होणार आहे. रोजचीं कामें नीटनेटकीं होणें, प्रापंचिक संकटें सह्य होणें किंवा तीं मुळींच न येणें, रोगराई दूर होणें, रोजच्या जेवणाची चिंता नसणें इत्यादि प्रकारांनीं जर व्यावहारिक जीवनाचा अर्थबोध होत असेल तर त्याहि प्रांतांत संतांनीं साम्यवादाचा प्रचार केलेला दिसून येतो. परमार्थाच्या विभागांत समान भूमिकेवर असणारा हीनयातींतील संत इतर व्यवहारांत अस्पृश्य म्हणूनच राहिला काय ? समकालीन लोकांनीं त्या अस्पृश्यसंतांना कसें वागविलें हें आपण पाहिलेंच. पण या संतांचीं वर्णनें व्यावहारिक दृष्टीनें ज्यांनीं ज्यांनीं केलीं त्यांनीं त्यांनीं व्यावहारिक जीवनांतील साम्यवादहि मान्य केला होता हें दिसून येतें. चोखा महाराचेंच उदाहरण उद्बोधक असें आहे.

## ' नीच याती न माने कांहीं '

चोखोबाच्या स्त्रीच्या बाळंतपणाचा प्रसंग नामदेवांनीं वर्णन केला आहे. प्रत्यक्ष विठाबाई सुइणीचें रूप घेऊन चोखोबाच्या घरीं आली आणि तिनें सर्व व्यवस्था चोखोबा आपल्या सख्या बहिणीस आणावयास गेलेला असतां केली. बंका महारानें चोख्याच्या घरीं विठ्ठलानें ' सहभोजन ' केल्याचें विस्तारानें वर्णन केलेलें आहे. दीनवृद्ध ब्राह्मणाचें सोंग घेऊन परमेश्वर चोखा महाराच्या घरीं आला आणि सोयराबाईस बोलला, ' क्षुधा बहु मज लागली साजणी । देई कांहीं आणूनि फराळासी । '. सोयराबाईस नवलच वाटलें. जातीचा ब्राह्मण आणि आपल्या घरीं जेवण मागतो ? ती म्हणाली, ' आम्ही हीन याती महार, आपण आमच्या हातचें जेवूं नये. ' पण ब्राह्मण बोलला : ' माझे प्राण कासावीस होत आहेत; मला जातीची कांहीं पर्वा नाहीं. ' सोयराबाईस विचार पडला : ' जेवावयास द्यावें तरी लोक मारपीट करतील. कारण ब्राह्मण बाटविला. बरें, न द्यावें तर ब्राह्मण उपाशीं राहतो. विन्मुख निघून गेला तर पति रागावेल ! ' तेव्हां तिनें पुनः विनवणी केली :

" आम्ही तो जातीचे आहेती महार ।<br>
तुम्ही तो थोर उंचवर्ण ।<br>
अन्नपाणी देतां निंदतील जन ।<br>
करतील ताडण मजलागी । "

यानंतर पांडुरंगानें तिची समजूत केल्यानंतर तिनें वाटीभर दहींभात देऊन वृद्ध ब्राह्मणास संतुष्ट केलें. अशा प्रकारें परमेश्वरानें भक्ताच्या घरीं अनेक वेळां जेवण केल्याचीं वर्णनें आपणांस वाचावयास मिळतात. दासी जनीचीं तर सर्वच कामें चक्रपाणि भगवंतच करीत असे. चोखा महार हा व्यावहारिक जीवनांतहि ब्राह्मणापेक्षां श्रेष्ठ होता. किंबहुना त्रैलोक्यांत त्याच्याएवढा श्रेष्ठ कोणीहि नाहीं, या तत्त्वाचा प्रचार एकनाथांनीं एक सुंदर कथा सांगून केला आहे. स्वर्गांतील इंद्रदेवाचें अमृत एकदां नासून गेलें. आतां हें अमृत शुद्ध कोठून होणार ? घाणीचा भपकारा आणि किळसवाणा रंग या अमृतास येत आहे. याला पूर्वीचें वैभव कोण प्राप्त करून देणार ? – या चिन्तेंत इंद्रदेव असतांना नारदमुनि आले व त्यांनीं एक उपाय सुचविला. पृथ्वीलोकांवर पंढरपूर नांवाचें एक क्षेत्र आहे तेथेंच हें अमृत शुद्ध होईल. स्वर्गांतील देवांचा राजा इंद्र ! त्यानें यःकश्चित् पृथ्वीकडे यावयाचें ? पण इलाज नव्हता. हा ' अडला हरि ' अमृताचा कलश घेऊन पंढरपुरास आला. इंद्राला वाटलें प्रत्यक्ष विठ्ठलच हें अमृत शुद्ध करून देईल. पण त्यानें चोखा महाराकडे बोट दाखविलें ! स्वर्गांतील इंद्राचें नासलेलें








अमृत शुद्ध करण्याचें काम चोखामहारांचें ! यांतील भावार्थ ध्यानांत येण्यासारखा आहे. चोखोबा अंतरींच्या प्रेमाचे भक्त होते. त्यांनीं विठ्ठलाच्या मनांतील भावार्थ ओळखला व त्याचेंच स्मरण करून अमृताच्या कलशास स्पर्श केला व त्याला पूर्वस्थिति प्राप्त करून दिली. ' चोखयाच्या घरीं शुद्ध होय अमृत ' या घटनेचा अर्थ मननपूर्वक ध्यानांत घ्यावयास पाहिजे. नीच यातींत जन्मलेल्या भक्ताच्या आध्यात्मिक व व्यावहारिक जीवनांतील सर्व गोष्टी परमेश्वर सांभाळतो हाच भावार्थ एकनाथांनीं एका अभंगांत निवेदन केला आहे.

' चोखियाची भक्ति कैसी । प्रेमें आवड देवासी ।
ढोरें ओढी त्याचे घरीं । नीच काम सर्व करी ।
त्याचे स्त्रीचें बाळंतपण । स्वयें करी जनार्दन ।
ऐसी आवड भक्ताची देखा । देव भुलले तया सुखा ।
नीच याती न मानें कांहीं । एका जनार्दनीं भुलला पाही ॥ '

अशा प्रकारें आध्यात्मिक क्षेत्रांतील समतावाद व्यावहारिक क्षेत्रांतहि उतरूं पाहात होता. एक शंका या ठिकाणीं येणें रास्त आहे. चोखोबाच्या चरित्रांतील या सर्व घटना म्हणजे भाकडकथाच नसतील कशावरून. ? यांपैकीं एकहि घटना प्रत्यक्ष घडलीहि नसेल. परमेश्वर सोयराबाईचें बाळंतपण करतो, तिच्याबरोबर जेवतो या गोष्टी भोळ्याभाळ्या बायांनाच पटण्यासारख्या आहेत. इंद्राचें अमृत चोखोबानें शुद्ध केलें ही पण अशीच एक न घडलेली चमत्कारिक घटना कथाकार आणि पुराणिक यांना उपयोगीं पडावी म्हणून एकनाथांनीं दिली. या भाकडकथांवरून का सामाजिक, व्यावहारिक समता अजमावयाची ? – या प्रकारचा आक्षेप अगदीं खरा आहे. वर वर्णन केलेली कोणतीच घटना खऱ्या अर्थानें घडली नाहीं असेंच आपण समजूं. पण चोखयाच्या घरीं परमेश्वरानें भोजन केलें, आणि चोखयाच्या बायकोचें बाळंतपण करून परमेश्वरानें अस्पृश्यता दूर सारली या केवळ ' कल्पना ' असल्या तरी त्याहि क्रांतिकारक आहेत. अस्पृश्यांना दडपून टाकण्याची पद्धतशीर योजना असतांना त्या काळीं प्रत्यक्ष परमेश्वर अस्पृश्याच्या घरीं केवळ तो संत म्हणून जेवण करावयास जातो व भक्ताच्या व्यावहारिक अडचणी दूर करतो या नुसत्या ' कल्पना ' जरी नामदेव किंवा एकनाथ यांना सुचल्या तरी त्यांचें मोल विशेष आहे. ज्या समाजांत अस्पृश्यांना जीवनच उरलें नव्हतें तेथें जनीचे केस विंचरणें, कबीराचे शेले विणणें, चोखयाच्या महारीचें बाळंतपण करणें हीं कामें सोंवळयातला सोंवळा मानल्या गेलेल्या परमेश्वरानें केलीं या कल्पना ' वाङ्मयांत स्थिर होणें याहि घटनांना फार मोठा अर्थ आहे.

## एकनाथांचा साम्यवाद

अध्यात्माची आणि ऐहिकतेची सीमारेषा कोणती हें सांगणें कठिण आहे. पण आध्यात्मिक प्रान्तांतील समतावाद व्यावहारिक जीवनांत कसा उतरूं पाहात होता हें एकनाथांच्या चरित्रावरून तर स्पष्टच होणारें आहे. एकनाथस्वामींची महती ही कीं त्यांनीं हा साम्यवाद प्रतिपादन तर केलाच पण प्रत्यक्ष व्यवहारांत स्वतः ( परमेश्वराकरवीं नव्हे ) हरिपंडितांचा विरोध पत्करून आचरणांत आणून दाखविला. गंगास्नानाला निघालेले असतांना महाराच्या रडक्या शेंबड्या पोरास उन्हाचा त्रास होऊं नये म्हणून त्यांनीं कडेवर घेतलें. आपल्या उपरण्यानें त्याचें तोंड पुसलें व त्याच्या आईबापांचा शोध करून त्यांचे स्वाधीन त्यास करून टाकलें. राण्या महाराचा शुद्ध भाव पाहून एकनाथस्वामी त्याच्या घरीं जेवावयास गेले. ब्राह्मणांनीं टीकेचा गदारोळ करतांच नाथांनीं सांगितलें, " त्याचें अनामिकपणाचें ज्ञान । मज तंव न दिसे ओळखण । दिसतो आत्मत्वें परिपूर्ण । सर्वांसमान सारिखा " ( केशवकृत नाथचरित्र, अ० १७-२६ ). वडिलांच्या श्राद्धाच्या समयीं केलेलें पक्वान्न या महात्म्यानें महारवाड्यांतील क्षुधितांना घालून टाकलें. नाथांच्या चरित्रांतील याहि ' घटनांना ' ऐतिहासिक पुराव्याचा आधार नसल्यास त्या खोट्या ठरतीलहि; पण त्यांतील भावार्थ किंवा कथा रचणाऱ्याच्या मनांतील हेतुहि खोटा आहे असें आपण म्हटलें तर आपली रसिकता व मार्मिकता संपली असेंच समजावें लागेल.

माणसामाणसांत विषमता आणि ती मागें सांगितल्याप्रमाणें जीवनाच्या सर्व क्षेत्रांत असावी हेंच सर्व अनर्थाचें मूळ मानलें जातें. धर्म, अर्थ, वर्ण, अधिकार, देश, भाषा, संस्कृति, ज्ञान, इत्यादि विविध कारणांनीं माणसामाणसांत फरक पडत राहतो. पण विषमतेचाच धर्म बनविणें व या विषमतेमुळेंच जीवनास वैचित्र्य व त्यायोगें शोभा प्राप्त झाली आहे,








परमेश्वरानेंच जेथें भरपूर विषमता निर्माण केली आहे तेथें आपण बापुडे मानव ती कशी दूर करणार ? — अशा प्रकारच्या तत्त्वज्ञानाचा पाया आजकाल ढांसळूं लागल्याचें आपण पाहतोंच. माणसानें एकमेकांत केवळ जातीवरून, वर्णावरून, पेशावरून, धर्मावरून भेद-उपभेद करावेत व त्यांत पुनः एक श्रेष्ठ दुसरा कनिष्ठ असें जन्मावरून ठरवावें ही रीत अगदींच विपरीत व माणुसकीस लांछन आणणारी आहे. केवळ जन्म अमक्या जातींत झाला म्हणून एखाद्या व्यक्तीच्या मनांतील नवविचारांचे कोंवळे अंकुर बाहेर येण्यास संधीच न देणें हा शुद्ध स्वार्थ आणि समाजाच्या दृष्टीनें घातकारक उपाय आहे. या विलक्षण समाजरचनेमुळें कित्येकांचीं जीवनें उदास होऊन गेलीं, कित्येकांचीं मुलें काळवंडून गेलीं, शतकेंच्या शतकें निघून गेलीं आणि मानवप्राण्याच्या एका फार मोठ्या विभागास सर्व सुखांना वंचित होऊन राहावें लागलें. माणसानें माणसाला किती हीनदीन करून टाकलें! विद्या नाहीं, पैसा नाहीं, धर्म खऱ्या अर्थानें नाहीं, व्यावहारिक सुख नाहीं — असें हें लाजिरवाणें जिणें माणसांनीं जगावें तरी कसें ? पशूंच्या पेक्षां आपण कांहीं वेगळें आहोंत ही जाणीवच त्यांना उरली नव्हती. ती करून देणारा पहिला महात्मा गौतम बुद्ध. आणि त्याच्याच म्हणण्याचा अनुवाद निदान या बाबतींत तरी कां होईना पण तो देशी भाषांना आध्यात्मिक वैभव व लावण्य प्राप्त करून देणाऱ्या साधुसंतांनीं केला व आध्यात्मिक साम्यवादाबरोबरच व्यावहारिक समतेची कल्पनाहि लोकांना आणून दिली. मराठी संतांची या बद्दलची कामगिरी आपण पाहिली. पुढें केव्हांतरी समकालीन भारतीय संत या साम्यवादाचा पुरस्कार कोणत्या मार्गानें करीत होते तें पाहूं.

---

## वीस लाख मराठी भाषिकांचा प्रश्न

**बस्तरची** लोकसंख्या ९ लाख असून, त्यांपैकीं २ लाख ६० हजार **हळबी मातृभाषीयांचा** चांद्याला व भंडाऱ्याला लागून असलेला प्रदेश महाराष्ट्रांत येणें अगदीं न्याय्य आहे हळबी बोली ही मराठीची पोटभाषा आहे. हळबी ही हलब म्हणजे हलवाहक ( शेतकरी ) लोकांची भाषा आहे. व संपूर्ण बस्तर-प्रदेशाची ती व्यवहारभाषा आहे. हळबी बोलींत मराठी शब्दांचें प्रमाण शें. ७३ आहे.

छिंदवाडा जिल्ह्यांतील सौंसर तहसील, नेमाडमधील बऱ्हाणपूर तहसील, बैतूलमधील मुलतापी व भैंसदेही या तहसिली आणि बालाघाट जिल्ह्यांतील वाराशिवनी तहसिली — मिळून २ लक्ष २५ हजार मराठीभाषी आहेत. यांना लागून असलेल्या इतर तहसिलींतील अनेक खेडीं पूर्ण मराठी आहेत.

आदिलाबाद व बिदर या दोन जिल्ह्यांतील निलंगा, अहमदपूर, उदगीर, किनवट, राजुरा आणि उतनूर या सहा तालुक्यांत ५ लाख ८५ हजार मराठीभाषी आहेत. याच दोन जिल्ह्यांतील द्विभाषी तालुक्यांत २ लाख १४ हजार मराठीभाषी आहेत.

बेळगांव जिल्ह्यांतील ५६८ खेड्यांत आणि कारवार-मधील कारवार, सुपा व हल्याळ तालुक्यांत ७ लाख मराठी-भाषी आहेत.

अशा रीतीनें हळबीसहित विदर्भांतील ५ लाख, मराठवाड्यांतील ८ लाख व बेळगांव-कारवारमधील ७ लाख — अशा वीस लाख मराठीभाषिकांना हिंदी, तेलगु, कानडी प्रदेशांत दडपण्यापूर्वीं रा. पु. समितीनें थोडा तरी विचार करावयास नको होता काय ?

— डॉ. शं. दा पेंडसे

[ पंढरपूरच्या म. सा. संमेलनांतील अध्यक्षीय भाषणांतून ( ३० । १२ । ५५ ) ]



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. वी. डी. महाजन

# लोकमत आणि लोकशाही

**अब्राहम लिंकननें** लोकशाहीची व्याख्या केलेली प्रसिद्ध आहे : 'लोकांचें, लोकांकडून, आणि लोकांकरतां असलेलें सरकार म्हणजे लोकशाही.' लोकशाहीची ही व्याख्या फक्त सरकारपुरती मर्यादित आहे. लोकशाही हा शब्द इतक्याच मर्यादित अर्थानें वापरला जात नाहीं. त्याला ह्याशिवाय विशाल अर्थहि आहे. लोकशाही हें जीवन जगण्याचें एक महान् तत्त्व आहे. लोकशाही-सरकार आणि लोकशाही तत्त्वानुसार जीवन हीं एकमेकांचीं पूरक आहेत. 'लोकशाही-सरकार' व 'लोकशाही तत्त्वानुसार जीवन' ह्यांमध्यें लोकमताचें काय स्थान आहे ह्याचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखांत करावयाचा आहे.

## आजची लोकशाही

आजची लोकशाही ही प्रातिनिधिक स्वरूपाची लोकशाही आहे. लोकांनीं घटनेच्या कायद्यानुसार ठराविक मुदतीनंतर प्रतिनिधी निवडून द्यावयाचे व त्यांनीं राज्यकारभार हांकावयाचा. प्रतिनिधी हें लोकांनीं निवडून दिलेले असल्याकारणानें ते लोकांना जबाबदार असतात. ह्याचाच अर्थ असा कीं, ते जे निर्णय घेतात ते लोकमतानुसार घेतात. अशी राज्यव्यवस्था ही टिकाऊ, कल्याणकारी व सर्वांचा उदय होण्याच्या दृष्टीनें योग्य अशी असते. असल्या लोकशाहीमध्यें सरकार अगर कायदेमंडळें हीं सार्वभौम नसतात. तत्त्वतः लोकमत हें सार्वभौम असतें. प्रत्यक्षांत वेळोवेळीं कायदेमंडळांत जे निर्णय घेतले जातात ते बहुमतानें घेतले जातात. निर्णय घेण्याची दुसरी कोणतीहि पद्धति अगर तत्र ह्यापेक्षां समाधानकारक व सर्वमान्य नसल्याकारणानें ह्याच तंत्राचा अवलंब केला जातो. ह्याचा अर्थ मात्र असा नव्हे कीं, जें बहुमत तेंच लोकमत ! अलीकडे बरेचसे लोक बहुमतालाच लोकमत समजून बहुमताला वाजवीपेक्षां जास्त किंमत देतात. परंतु ही गोष्ट लोकशाहीच्या दृष्टीनें फारच विघातक आहे. अशा परिस्थितींत लोकमत याचा खरा अर्थ कोणता आहे हें समजून घेणें फार आवश्यक आहे.

## लोकमत म्हणजे काय ?

लोकमत हा शब्द जरी सोपा दिसत असला तरी त्याचा अर्थ सांगणें ही फार कठीण गोष्ट आहे. शब्दशः लोकमत म्हणजे लोकांचें मत असा जरी बरवर अर्थ असला तरी लोक व मत हे दोन्ही शब्द फार संदिग्ध व कठीण असे आहेत. कांहींच्या मतें लोक म्हणजे राष्ट्रांतील सर्व नागरिक. लोक ह्या शब्दामध्यें सर्व नागरिकांचा जर समावेश केला तर सर्व नागरिकांना मत म्हणून असतें हें बरेचसे लोक नाकबूल करतात. अशा विचारसरणीच्या लोकांचें म्हणणें असें कीं, 'लोकांना काय पाहिजे किंवा त्यांचें मत काय ह्याची त्यांना कल्पना असूंच शकत नाहीं. म्हणून राज्य-( State )-संस्थेनें लोकांकरितां काय करावयाचें अगर काय करावयाचें नाहीं ह्याचा निर्णय घ्यावा. हा निर्णय एकदां घेतल्यानंतर लोकांचें कार्य फक्त तो निर्णय अमलांत आणण्यास सहकार्य करण्याचें रहातें. सहकार्य लोक स्वेच्छेनें जर देत असतील तर राज्य-संस्थेनें त्यांचें सहकार्य मिळवून घ्यावें.' ही विचारसरणी लोकशाहीच्या मूळ तत्त्वांशीं विसंगत अशी आहे. लोकशाहीमध्यें प्रत्येक व्यक्तीला मत असतें व लोकशाहींत निर्णय जे घेतले जातात त्यावर व्यक्तींच्या मतांचा परिणाम होत असतो. असें सुद्धां म्हणतां येईल कीं हे निर्णय सर्व व्यक्तींच्या मतांच्या परिणामांचें फळ असतें. ह्यामध्यें अडचण निराळीच आहे. मत म्हणजे बुद्धिशील माणसानें स्वतंत्र विचारसरणीनें घेतलेला निर्णय. हा अर्थ मानला तर सर्व व्यक्ती असलें मत बनवूं शकतात अगर बनवण्यास पात्र असतात हें सद्यःपरिस्थितीवरून खरें वाटत नाहीं. ग्रॅहम् वॅलस् ह्यानें आपल्या 'Human Nature in Politics' ह्या पुस्तकांत असें दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे कीं, माणूस राज्यव्यवहारविषयक बाबींमध्यें निर्णय घेतांना विवेकशक्तीच्या आधारेंच








मत बनवतो असें नव्हे; तर भावना ( Emotions ) *व सहजप्रेरणा* ( Natural Instincts ) ह्यांचा पगडा त्याच्या मनावर असतो. व निर्णय घेतांना त्या कार्यशील बनून त्याप्रकारें निर्णय बदलवीत असतात. बरेच वेळां आपल्याला असें आढळून येतें कीं माणूस हा ज्या व्यक्तिसमूहांत अगर संस्थेत राहतो त्या व्यक्ति-समूहाच्या मतांचा अगर संस्थेचा परिणाम त्याच्या मतावर होतो. मार्क्सच्या म्हणण्याप्रमाणें व्यक्तीचें मत हें ती ज्या वर्गांतील ( Class मधील ) असेल त्या वर्गाचें मत असतें. व्यक्तीचें निराळें असें मत नसतें. व्यक्तीच्या मताला भांडवलशाही समाजव्यवस्थेत कांहीं अर्थ नसतो. तें निष्प्रभावी असतें. म्हणजे व्यक्तीच्या मतांवर भोंवतालीं असणाऱ्या परिस्थितीचा अत्यंत प्रभाव असतो. ह्या सर्व अडचणी लक्षांत ठेवून आपणांस असें म्हणतां येईल कीं लोकमत म्हणजे वस्तुस्थितीचें आकलन करून, त्याचें तार्किक दृष्ट्या विवेचन करून, नैतिक कसोटीच्या आधारें घेतलेला निर्णय. लोकशाही ह्या असल्या लोकमतांवर आधारलेली असते.

ह्या लोकमताचा व दररोजचे निर्णय ज्या बहुमतानें घेतले जातात त्या बहुमताचा परस्पर काय संबंध असतो तो पाहूं या.

## लोकमत आणि बहुमत

ह्या बाबतींत आपल्याला असें म्हणतां येईल कीं ( १ ) बहुमत आणि लोकमत हीं भिन्नभिन्न असतात; ( २ ) बहुमत हें लोकशाहीमध्यें लोकमतानें मर्यादित असतें; ( ३ ) बहुमत हें लोकमताप्रत जाण्याचा प्रयत्न करीत असतें.

बहुमत आणि लोकमतांमधील फरक म्हणजे बहुमत हें संख्याधिक्यावरून ठरविलें जातें; परंतु लोकमत संख्याधिक्यापेक्षां गुणविशेषांवरून ठरविलें जातें. गुणाचें ( quality चें ) मोजमाप करणें अत्यंत अवघड असल्याकारणानें बहुमतानें निर्णय घेतले जातात. बहुमत आणि लोकमत ह्यांमध्यें जर विरोध निर्माण झाला तर लोकशाहीमध्यें सरकार-बदल होत असतो. जबाबदार राज्यपद्धतीमध्यें सत्तारूढ असलेला पक्ष सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळीं लोकमत त्याच्या विरुद्ध असल्याकारणानें बाजूला फेंकला जातो. व त्या जागीं दुसरा पक्ष सत्तारूढ होतो. सत्तारूढ असलेल्या पक्षाचें मत म्हणजे बहुमत जर लोकमताशीं सहमत असलें तर त्या पक्षाला आपलें धोरण यशस्वी करण्यास चांगली संधि प्राप्त होते. ह्यावरून लोकमत हें बहुमतापेक्षां श्रेष्ठ व शक्तिमान् असतें असें दिसून येईल.

रशियासारख्या हुकुमशाही राष्ट्रांमध्यें देखील बहुमतानें निर्णय घेतले जातात. ह्यावरून एक गोष्ट स्पष्ट होते. ती ही कीं, बहुमतानें निर्णय घेणें हें लोकशाहीचेंच लक्षण नव्हें. हुकुमशाही राष्ट्रांमध्यें बहुमत म्हणजे आज जो पक्ष सत्तारूढ असेल ( –हुकुमशाही राष्ट्रांत एकाच पक्षाला मान्यता असल्यामुळें दुसऱ्या पक्षाचा प्रश्न उपस्थित होतच नाहीं– ) त्याचें मत लोकमतानें मर्यादित नसून लोकमत हें बहुमतानें मर्यादित असतें. तेथें लोकमत आणि बहुमत ह्यांमध्यें जर विरोध उत्पन्न झाला तर बहुमताला लोकमताप्रत नेण्याचा प्रयत्न होत नाहीं; तर उलट, लोकमताला बहुमताप्रत खेंचण्याचा प्रयत्न होत असतो. अर्थात् तेथें लोकमत हें चौकटींत ( organized ) बसविलें जातें. तें स्वतंत्र असें नसतें. लोकशाहीमधील लोकमत हें स्वतंत्र असतें. लोकशाहींतील प्रत्येक माणूस स्वतंत्ररीत्या विचार करून आपलें मत बनवितो. अशा सर्व व्यक्तींचीं मतें मिळून एक नवीन मत निर्माण होतें. हें जें नवीन मत तयार होतें तें म्हणजे समाजांतील सर्व व्यक्तींच्या मतांची नुसती बेरीज नसते अगर त्यांपैकीं बहुसंख्याकांच्या मतांची बेरीज नसते. तर हें नवीन मत जें तयार होतें, तें प्रत्येकाच्या मताचें इतरांच्या मतांशीं समिश्रण होऊन त्यामधून सर्वसंमत असें नवीन मत तयार होतें तें होय. हें मत सर्वसंमत अशा सामाजिक, राजकीय, व नैतिक मूल्यांवर आधारलेलें असतें.

रशियासारख्या हुकुमशाही राष्ट्रांमध्यें पण प्रत्येक माणसाला मत असतें असें गृहीत धरलेलें आहे. परंतु तेथें, संगीत-दिग्दर्शकाच्या संकेताप्रमाणें ज्याप्रमाणें कलामंडळीमधील सर्व कलाकारांना आपली हालचाल करावी लागते, त्याप्रमाणें एका माणसाच्या अगर कांहीं व्यक्तींच्या कमेटीच्या मतप्रदर्शनानुसार प्रत्येकाला आपलें मत बनवितां येतें व प्रदर्शित करतां येतें. दिग्दर्शकाच्या संकेताविरुद्ध मत प्रदर्शित करण्याला तेथें वाव नसतो. लोकशाहीमध्यें मात्र प्रत्येकाला आपलें जें मत असेल तें प्रदर्शित करण्याला वाव असतो. इतकेंच नव्हे तर त्याप्रमाणें वागण्याची












( ठराविक मर्यादा सांभाळून ) मोकळीक असते. लोकशाहीमध्यें अल्पमताला चिरडतां येत नाहीं. हुकुमशाही राष्ट्रांमध्यें मात्र अल्पमत चिरडून टाकलें जातें. लोकशाहीमध्यें बहुमताच्या विरुद्धसुद्धां प्रत्येक व्यक्तीला अगर पक्षाला आपलें मत स्वतंत्ररीतीनें प्रतिपादितां यावें म्हणून हक्क दिलेले असतात. ह्या हक्कांचें जतन राष्ट्र करीत असतें. ह्या हक्कांवर दुसऱ्या कोण्या व्यक्तीनें, संस्थेनें अगर प्रत्यक्ष सरकारनें आक्रमण केलें तर त्या व्यक्तीला कोर्टांत दाद मागतां येते.

### बहुमतवाल्या हुकुमशाहीला धोका

आतांपर्यंत आपण लोकशाहीमधील लोकमताचें तात्त्विक भूमिकेवरून विवेचन केलें. सध्यां लोकशाही म्हणवणाऱ्या राष्ट्रांमध्यें लोकमताचें काय स्थान आहे ह्याविषयीं जर अभ्यास केला तर बराच फरक आढळून येतो. ह्या राष्ट्रांतून स्वतंत्र व जागरूक असें लोकमत अस्तित्वांत असलेलें आढळून येत नाहीं. ह्याच्या कारणमीमांसेविषयीं जर विचार करूं लागलों तर असें आढळून येतें कीं, आज सर्वसाधारण माणसाच्या दिवसांतील तीन चतुर्थांश अगर त्याहिपेक्षां ज्यास्त वेळ पोट भरण्याचे उद्योग करण्यांत खर्च होतो. त्याला राजकीय, सामाजिक अगर आर्थिक अशा निरनिराळ्या प्रश्नांवर आपलें मत स्वतंत्ररीतीनें अभ्यास करून बनविण्यास वेळ नसतो व कुवत पण नसते. म्हणून मतप्रचाराचा परिणाम फार होतो. तयार केलेलीं मतें लोक स्वतः होऊन कवटाळतात. व तीं आपलींच मतें आहेत असें मानतात. आज मतप्रचाराचीं जितकीं कांहीं साधनें आहेत ( उदा० वर्तमानपत्रें, रेडिओ, सिनेमा, टेलिव्हिजन इत्यादि ) तीं कांहीं ठराविक लोकांच्या हातीं आहेत. त्यामुळें त्यांना जीं मतें ग्राह्य असतील तेवढ्यांचाच प्रचार खूप जोरानें होतो. सत्तारूढ पक्ष अर्थात्‌च आपल्या अनुकूल परिस्थितीचा फायदा घेऊन प्रचाराचीं सर्व साधनें आपल्या हातीं कशीं राहतील अशी व्यवस्था करीत असतो. हीं साधनें ज्यांच्या ताब्यांत असतात ते आपलें मत इतरांवर परिणामकारक रीत्या लादूं शकतात, व लोकमत आपल्या बाजूला वळवूं शकतात. लोकमताचें स्वातंत्र्य अशा रीतीनें नकळत हिरावून घेतलें जातें. सध्यांचें बहुमत आपली हुकुमशाही स्थापन करतें. आज लोकशाहीला विशेषतः भारतासारख्या नवलोकशाहीला खरा धोका हा असल्या बहुमताच्या हुकुमशाहीपासून आहे. ह्या धोक्यापासून लोकशाहीचें जर रक्षण करावयाचें असेल, तर बहुमताच्या हुकुमशाहीला सुरुंग लावायला पाहिजे. म्हणजेच लोकमत बनवणारीं जेवढीं कांहीं साधनें असतील त्यांवरील थोड्या लोकांची अगर एकाद्या पक्षाची आज जी कंत्राटदारी दिसून येते ती नष्ट करून सर्वांना त्यांचा उपभोग घेतां येईल, अशी परिस्थिति निर्माण केली पाहिजे. अशा परिस्थितींत खरें स्वतंत्र लोकमत निर्माण होईल. असल्याच लोकमतांवर लोकशाहीची उभारणी ज्या वेळीं होईल त्याचवेळीं खरी लोकशाही अस्तित्वांत येईल. **मेनकेन** यांनीं म्हटल्याप्रमाणें लोकशाहींतील वाईट गोष्टी काढून टाकण्यावर एकच मार्ग व तो म्हणजे पुन्हां जास्त लोकशाही : ' The cure for the evils of democracy is more democracy ! "

---

## शिशिर

**थंडीच्या कांटेरी मिठींतुन**
**निखटुन धांवे धुकें पांघरुन**
**बोंचक वारा !**
**कंपित करि तृणपर्णफुलांना**
**संथ जळांवर घालुन फुंकर**
**बघतो वलयें !**
**अल्लड अवखळ, निजस्पर्शानें**
**उघड्या अंगांवरी उमलवी**
**नाजुक कांटे !**
**वर्षाकालीं**
**कुशींत जपलेल्या बीजांतुन**
**हिरव्या झालेल्या भूमीवर**
**गर्भवतीसम**
**चढूं लागली**
**पुनवेच्या चंद्राची कांति !**
**अनिमिष बघतो**
**निशिदिनिं उजळुन आकाशाचा**
**निरभ्र निळसर विशाल डोळा !**

— माधव गोविंद काटकर








श्री. अ. ज. करंदीकर

# देवपुत्र कनिष्काचा पुराणोक्त इतिहास

१९५१ मधील फेब्रुवारीच्या 'सह्याद्री'त 'बुद्धाचा वंश' या विषयावर एक लेख लिहून मी असें दाखवून दिलें होतें कीं गौतम बुद्ध हा पीतवर्णी मोंगोलियन् समाजांत जन्माला आला होता आणि तेव्हां उत्तरपूर्व भारतांतील आर्यांचा पीतवर्णी टोळ्यांशीं जो प्राणांतिक लढा चालू होता, त्यांत बुद्धाची सहानुभूति पूर्णपणें पीतवर्णी समाजाच्या पक्षाला होती. इतकेंच नव्हें तर मगधांतील आर्यसमाजाचा अपकर्ष व्हावा, आणि मोंगोलियन् समाजाचा उत्कर्ष व्हावा. या हेतूनेंच बुद्धानें आपला सारा धर्मप्रचार चालविला होता. त्या लेखांतील हीं महत्त्वाचीं प्रमेयें भारतीय विद्याभवनाच्या वतीनें नंतर प्रसिद्ध झालेल्या 'Age of Imperial unity' ('साम्राज्ययुग') या ग्रंथाचे एक प्रमुख संपादक डॉ. रमेशचंद्र मुजुमदार यांनींहि बहुतांशीं मान्य केलीं आहेत. त्या ग्रंथाच्या ३६३ व्या पानावर ते लिहितात : 'The Eastern part of India, even when Aryanised, preserved considerable differences from midlands in point of language, ethnic elements and culture and this undoubtedly explains the origin of the two heterodox sects in this very region. The Shakya clan had probably a Mongolian strain in their blood.' म्हणजे "पूर्व-भारतांत आर्य संस्कृतीचा प्रसार झाल्यानंतर सुद्धां इतर आर्यावर्तांत आणि त्या भागांत भाषा, वंश आणि संस्कृति या सर्वांच्या दृष्टीनें महत्त्वाचे प्रभेद राहून गेले होते. यामुळेंच त्या भागांत बौद्ध आणि जैन या वेदविरोधी पंथांचा प्रादुर्भाव झाला. ज्या शाक्य समाजांत गौतम बुद्ध जन्माला आला, त्या समाजांत बहुधा मोंगोलियन् रक्ताचें मिश्रण झालें होतें." 'साम्राज्य-युगा'च्या मुख्य संपादकांनीं ऐतिहासिक सत्याला इतपत मान दिला असला तरीसुद्धां बुद्धाच्या देखतच तत्कालीन मगधसम्राट् अजातशत्रु यानें पाटलीपुत्राचा दुर्ग बांधून त्या दुर्गाच्या आश्रयानें लिच्छवी, शाक्य, मल्ल इत्यादि पीतवर्णी टोळ्यांवर जो अविस्मरणीय विजय मिळविला, त्याचें वास्तविक महत्त्व त्या अधिकारी इतिहासलेखकांना अद्यापि कळून आलेलें नाहीं. अजातशत्रूच्या मृत्यूनंतर पराजित पीतवर्णी टोळ्यांच्या नायकांनीं कोलेरियन् समाजांतील गुंडांच्या नेतृत्वाखालीं त्याचा पुत्र उदायी याच्याविरुद्ध बंड उभारलें आणि पुढें मारेकऱ्याच्या हातून उदायीची हत्या झाल्यानंतर पाटलीपुत्र हस्तगत करून तेथें अनार्य-राज्य प्रस्थापित केलें. भारतीय आर्यांच्या मगधांतील वर्चस्वाला मोंगोलियन् आणि कोलेरियन् टोळ्यांनीं चालविलेला विरोध बुद्धनिर्वाणानंतर सरासरी शंभर वर्षेपर्यंत तसाच चालू राहिला. सरते शेवटीं शैशुनारि काकवर्ण राजानें या अनार्य टोळ्यांचा संपूर्ण पराजय लरून या विरोधाचीं पाळेंमुळें खणून काढलीं. या कामांत काकवर्ण राजाला प्राप्त झालेलें यश इतकें चिरस्थायी होतें कीं त्यानंतर तो स्वतःहि उदायीप्रमाणेंच मारेकऱ्यांना बळी पडला तरी त्याच्यामागें त्या अनार्य टोळ्यांना मगधांत अराजक निर्माण करतां आलें नाहीं. याप्रमाणें पूर्वभारतांत शेंकडों वर्षें चाललेल्या संग्रामामध्यें पीतवर्णी मोंगोलियन् टोळ्यांचा संपूर्ण पराजय झाल्यानंतर त्यांनीं भारतीय सीमेवर आक्रमण करण्याकरितां ईशान्य सीमेपेक्षां वायव्य सीमाच अधिक उपयुक्त असल्याचें ग्रीक-शकादिकांच्या उदाहरणांवरून ओळखून तिकडेच आपलाहि मोर्चा वळविला. भारतावरील कुषाणांच्या आक्रमणाची ही पूर्वपीठिका लक्षांत घेतल्यावांचून तत्कालीन इतिहासाचा उलगडा होणार नाहीं, अशा समजुतीनेंच कीं काय कोण जाणे, प्राचीन बौद्ध लेखकांनीं कुषाणसम्राट् कनिष्क हा गौतमबुद्धाच्या वंशांतील असल्याचा उल्लेख करून ठेविला आहे.

### कनिष्क = बाणासुर = जालंधर

बुद्धोत्तर भारताच्या इतिहासांत कनिष्काच्या इतकें विराट् व्यक्तित्व असलेला अन्य कोणीच सम्राट् झाला नाहीं आणि भारतांतील सनातनी समाजावर त्याच्याइतका अन्य कोणत्याच सम्राटाचा प्रभाव पण पडला नाहीं, हें 'हरिवंशां'त बाणासुराच्या नांवानें, 'पद्मपुराणां'त जालंधर दैत्याच्या नांवानें, किंवा 'गणेशपुराणां'त सिंधु

या अंकांतील प्रस्तुत लेख हा पूर्वार्ध आहे. पुढील अंकीं उत्तरार्ध येईल. – का. सं.

# देवपुत्र कनिष्काचा पुराणोक्त इतिहास

दैत्याच्या नांवानें सनातनी हिंदूंनीं आपल्या सर्वांत श्रेष्ठ शत्रूंचीं जीं अविस्मरणीय आख्यानें लिहून ठेविलीं आहेत, त्यांवरून स्पष्ट कळून येतें. त्याचें वर्णन करतांना 'भागवत'कारांनीं 'शिवभक्तिरतः सदा। मान्यो वदान्यो धीमांश्च सत्यसंधो दृढव्रतः'॥ असे सार्थ आणि साभिप्राय शब्द वापरले आहेत. 'पद्मपुराण'कारांनींहि जालंधराच्या म्हणजे कनिष्काच्या राज्याची अगदीं निर्मत्सर मनानें स्तुति केली आहे. 'मंगलं तत्र सर्वेषां न कश्चित् वधबंधनम्। मरणं न च हिंसाऽस्ति न कश्चित् केन बाध्यते॥' ही केवळ अर्थवादात्मक स्तुति आहे, असें कोणी समजतील. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. कनिष्काचा एक महाक्षत्रप रुद्रदामन् याच्या शिलालेखांत त्यानें स्वतः अशीच प्रतिज्ञा करून ती पाळल्याचा उल्लेख आढळतो. 'सर्ववर्णैरभिगम्य रक्षणार्थं पतित्वे वृतेन, आप्राणोच्छ्वासात् पुरुषवधनिवृत्तिकृतप्रतिज्ञेन अन्यत्र संग्रामेषु' म्हणजे 'प्राणांत प्राण असेपर्यंत संग्रामाव्यतिरिक्त अन्य प्रसंगीं पुरुषवध करणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून' ती खरी केल्याचें स्पृहणीय उदाहरण घालून दिल्याचा उल्लेख आला आहे. प्राणिहिंसेवरील निर्बंध न पाळल्याबद्दल अशोकानें मानवांना देहान्तशासन केल्यामुळें राज्याभिषेकांत ही प्रतिज्ञा घालावी लागली. गुप्त सम्राट् तर देहान्त शासनच काय, पण नुसता देहदंड सुद्धां अपराध्यांना करीत नसत, असें फाहियान या चिनी प्रवाश्यानें लिहून ठेविलें आहे. 'एवं जालंधरः कृत्वा देवान् स्ववशवर्तिनः। धर्मेण पालयामास प्रजाः पुत्रान् इवौरसान्॥' 'पद्मपुराणां'तील जालंधराख्यानांत परस्त्रीलोलुपतेमुळें जालंधराचा अधःपात झाला असें वर्णन आलें असलें तरी तें पातक जालंधर देशाच्या पहिल्या सम्राटाच्या हातून घडलें नसून त्याच्या वंशजांच्या हातून घडलें होतें ही वस्तुस्थिति त्या पुराणकारांना सुविदित होती. पण कुषाण घराण्याचा उदयास्त एकाच आख्यानांत समाविष्ट करतांना त्यांनीं तिकडे थोडें दुर्लक्ष केलें आहे.

कनिष्काचें साम्राज्य मध्य आशियापासून मगधापर्यंत पसरलें असतांना पद्मपुराणकार आणि भारतांतील बौद्धपंथाचा इतिहास लिहिणारे लामा तारानाथ हे त्याला अनुक्रमें जालंधर आणि जालंधराधीश कां म्हणतात याचा प्रथम विचार केला पाहिजे. 'पद्मपुराण'कारांच्या मताप्रमाणें जालंधर देश व्यापण्यापासून कनिष्काच्या कर्तृत्वाचा प्रारंभ झाला आणि त्यामुळेंच बहुधा त्याला जालंधर ही संज्ञा चिकटली असावी. 'पद्मपुराणा'च्या उत्तरखंडांतील पांचव्या अध्यायांत भार्गवानें जालंधराचा पिता जो सिंधु, त्याला उपदेश करतांना म्हटलें आहे : "तवात्मजो विक्रमेण त्रैलोक्यं भोक्ष्यते ध्रुवम्। जंबुद्वीपे महापीठं योगिनीगणसेवितम्। आप्लावितं त्वयेदानीं मुंच जालंधरालयम्। तत्र राज्यं प्रयच्छास्मै तनयाय महार्णव। अजेयश्चाप्यबद्धश्च तत्रस्थोऽयं भविष्यति॥" अर्थात् "तुझा पुत्र आपल्या पराक्रमानें त्रैलोक्याचा उपभोग घेईल. जंबुद्वीपांतील योगिनीगणसेवित जालंधर नामक महापीठ आतां तूं जें व्यापलें आहेस, तें मोकळें करून तुझ्या पुत्राला दे. जालंधराचा राजा झाला म्हणजे तो अजेय आणि अबद्ध होईल."

## यौधेय – त्रिगर्त

येथें पहिला महत्त्वाचा प्रश्न हा उद्भवतो कीं प्राचीन काळचा जालंधर देश कोठें होता? कोशावरून जालंधर देशाला 'त्रिगर्त' असेंहि अपरनाम असल्याचें कळून येतें. या त्रिगर्तांची वसति आधुनिक पंजाबांतील लाहोर, जालंधर आणि कांग्रा या साऱ्या जिल्ह्यांतून होती. यौधेयत्रिगर्तांच्या जोडीचा पाणिनीच्या सूत्रांतून एकत्र उल्लेख येत असल्यामुळें त्या दोन आयुधजीवी गणांचा प्रदेश परस्परांसन्निध असून त्यांचें परस्परांशीं सख्यहि होतें, असें दिसतें. महाभारतांत त्रिगर्तांच्या शौर्याची अतिशय स्तुति केली असूनहि ख्रिस्तोत्तर काळांतील भारताच्या इतिहासांत त्यांचा नुसता उल्लेखहि आढळत नाहीं. आपल्या इतिहासांतील हें कोडें उलगडण्याचा आजपर्यंत कोणी प्रयत्नहि केला नाहीं. पण मला वाटतें कीं 'पद्मपुराणां'तील वर उतरून घेतलेल्या श्लोकांवरून हें कोडें उलगडतां येतें. त्या श्लोकांतील माहितीवरून असें कळून येतें कीं कनिष्काचें जेव्हां स्वाऱ्या करण्याचें वय झालें, तेव्हां जालंधर अथवा त्रिगर्त देशांत सर्वत्र जलप्रलय होऊन त्याला महार्णवाचें स्वरूप प्राप्त झालें होतें. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं त्रिगर्तांना यौधेयांनीं आपल्या देशांत आश्रय दिला. त्यामुळें यौधेय आणि त्रिगर्त हे समाज जवळजवळ अभिन्न आणि एकजीव होऊन गेले. म्हणून कुषाणकाळांतील युद्धांतून एकट्या यौधेयांचेंच नांव ऐकूं येतें. मात्र त्रिगर्तांच्या पृथक् अस्तित्वाची खूण म्हणून त्यांच्या प्रदेशांत घडलेल्या यौधेयांच्या








नाण्यांवर ' त्रि ' हें अक्षर खोदलेलें असतें. यौधेयांच्या कांहीं नाण्यांवर 'त्रि' आणि 'द्वि' हीं अक्षरें आढळून येतात, ही गोष्ट जनरल कनिंगहॅम् यांनीं उघडकीला आणल्याला सरासरी एक शतक लोटलें असलें तरी त्या अक्षरांचा आमच्या इतिहासकारांना अद्यापि अर्थ लावतां येत नाहीं. असो. त्या अक्षरांपैकीं ' त्रि ' हें अक्षर त्रिगर्तांचें निदर्शक आहे, हें एकदां ओळखलें म्हणजे 'द्वि' हें अक्षर द्विगर्तांचें निदर्शक असल्याचें लगेच लक्षांत येतें. हा द्विगर्त गण डोग्रा रजपुतांच्या रूपानें अजून टिकून राहिला आहे, इतकेंच नव्हें तर आपल्या शौर्याची कीर्तिहि त्यानें अजून टिकविली आहे, हें उत्तरेकडील विद्वानांना सुविदित आहेच. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे त्रिगर्तांच्या पश्चिमेकडील प्रदेश व्यापून बसलेल्या कुषाणांनीं एका जलप्रलयानंतर रावी नदी ओलांडून त्रिगर्तांचा सारा देश व्यापून टाकला आणि कुषाणांच्या या आक्रमणाचा नेता कनिष्क असल्यानें 'पद्मपुराण'कारांनीं त्याला जालंधर ही संज्ञा दिली, हा इतिहास उजेडांत येतो.

आपल्या पुराणकारांना कनिष्काच्या राज्याची चांगली माहिती होती, हें 'विष्णुपुराणां'तील इतिहासकथनांत ' स्त्रीराज्यत्रैराज्यमूषिकजानपदान् कनकाव्हयः भोक्ष्यति ' असा जो उल्लेख आला आहे, त्यावरूनहि सिद्ध होतें. येथें उल्लेखिलेला कनक हा दक्षिणेंतील कदंब घराण्यापैकीं कंगवर्मा असावा, असें कै. काशीप्रसाद जायस्वाल यांनीं आपल्या इतिहासांत ठरविलें असलें तरी तिथें त्यांची दिशाभूल झाली आहे. स्त्रीराज्याचें स्थान निश्चित करतांना श्री. नंदलाल दे हे आपल्या भौगोलिक कोशांत लिहितात : ' That an Amazonian Kingdom existed in the trans-Himalayan valley of the Sutlaj, as stated by Hiuen Tsiang, is confirmed by Atkinson's Himalayan Districts. ' म्हणजे सतलज नदीच्या उगमाकडील हिमालयाच्या प्रदेशांत युआन च्वांगनें म्हटल्याप्रमाणें खरोखरीच एक स्त्रीराज्य होतें, ही गोष्ट ॲट्किन्सन्‌च्या हिमालयांतील जिल्ह्यांच्या वर्णनावरून सिद्ध झाली आहे. स्त्रीराज्यानंतरचें त्रैराज्य हें एकट्या त्रैगर्तांचें राज्य होऊं शकेल, किंवा वर सुचविल्याप्रमाणें त्रिगर्त-द्विगर्त-यौधेयांचें संयुक्त राज्य असूं शकेल. सिंधच्या उत्तरभागाला प्राचीन काळीं मूषिक ही संज्ञा होती. या संज्ञेचा उल्लेख टॉलेमी, स्ट्राबो यांच्यासारख्या ग्रीक-रोमन लेखकांनींहि केला आहे. परस्परांशीं संलग्न असलेल्या या तीन देशांवर राज्य करणारा कनक हा अश्वघोषाच्या महाराजकनिकलेखांतील कनिक म्हणजे कनिष्कच आहे हें सिद्ध करण्याचीहि आवश्यकता नाहीं. अवतरणांतील ' त्रैराज्य ' शब्दाच्या अर्थाविषयीं कोणाला शंका असल्यास वायु आणि ब्रह्मांड पुराणांतील ' स्त्रीराष्ट्रं भोजकांश्चैव भोक्ष्यते कनकाव्हयः ' या वचनानें तो दूर होईल. यौधेय हे यादवकुळांतले असल्यानें यादवांचीं भोज इत्यादि नांवेंहि त्यांना लावीत असत. या नांवांपैकीं शूर हें नांव त्यांना अत्यंत प्रिय असून त्या नांवाला साजेशीच आपली कीर्ति असावी, याविषयीं त्यांचा फार कटाक्ष होता. कनिष्काचा एक महाक्षत्रप रुद्रदामन् यानें यौधेयांचा पराजय केल्याची बढाई सांगतांना ' सर्वक्षत्राविष्कृतवीरशब्दजातोत्सेक-अविधेयानाम् ' म्हणजे साऱ्या क्षत्रियांमध्यें वीर या वैशिष्ट्यपूर्ण संज्ञेनें ओळखले जात असल्यामुळें उद्दाम झालेले यौधेय, असें त्यांचें वर्णन केलें आहे. यौधेय हा गण असल्यानें त्यांच्यांत एकछत्री राजे नव्हते. त्यांच्या एका महाराज महासेनापतीचा उल्लेख मात्र एका शिलालेखांत आढळतो. त्यामुळें देवसेनापति स्कंद कार्तिकेयाचीच ते मुख्यत्वेंकरून उपासना करीत असत. महाचीन, मध्य आशिया आणि अफगाणिस्थान या सर्व देशांतून आलेल्या शककुषाणांच्या टोळधाडीनें रुद्रदामनाच्या नेतृत्वाखालीं खिस्ताब्द १५० च्या सुमाराला यौधेयांचा पराजय करून त्यांचा उच्छेद केल्याची बढाई मारली असली तरी त्यानंतर एका शतकाच्या आंतच यौधेयांनीं कुषाणांची सत्ता झुगारून देऊन आणि आपलीं स्वतंत्र नाणीं पाडून पुनश्च एकवार यौधेयगणाच्या विजयाची दुंदुभि वाजविली, असें डॉ. आळतेकरांनीं आपल्या संशोधनानें सिद्ध केलें आहे. त्यांनीं रचलेल्या पायावरच देवपुत्र कनिष्काच्या पुराणोक्त इतिहासाची उभारणी कशी करतां येईल, याची रूपरेखा तरी या अधिकारी इतिहास-लेखकांना दाखवावी, या अपेक्षेनेंच मी माझ्या








साहसी संशोधनाला आज प्रवृत्त झालों आहे.

## कार्तिकस्वामीचें रुधिरपुर

कार्तिकेयाचे महाभक्त असलेल्या यौधेयांचा कुषाण साम्राज्याच्या आद्यंतांशीं असलेला अविच्छेद्य संबंध लक्षांत घेतला म्हणजे हरिवंशादि पुराणांतून संगृहीत केलेला कुषाणांचा इतिहास आपल्याला थोडाफार उलगडूं लागतो. 'हरिवंशां'तील बाणासुराच्या आख्याना-च्या आरंभींच जनमेजयानें वैशंपायनाला विचारलें आहे : 'कथं च देवदेवस्य पुत्रत्वमसुरो गतः।' म्हणजे या असुराला देवदेवाच्या पुत्राची पदवी कशी प्राप्त झाली ? हा प्रश्न वाचतांच कोणाहि इतिहाससंशोधकाला या आख्यानाच्या ऐतिहासिक महत्त्वाची कल्पना यावयाला पाहिजे. या प्रश्नाला वैशंपायनानें दिलेलें उत्तर वाचलें कीं आपण समकालीन ऐतिहासिक पुराव्याच्या क्षेत्रांत संचार करीत असल्याची मनाला जाणीव होते.

" दृष्ट्वा वपुः कुमारस्य क्रीडतश्च महात्मनः ।
बलिपुत्रो महावीर्यो विस्मयं परमं गतः ।
तस्य बुद्धिः समुत्पन्ना तपश्चर्तुं सुदुष्करम् ।
रुद्रस्याराधनार्थाय देवस्य स्याम् यथा सुतः ॥ "

म्हणजे देवासन्निध एकुलता एक कार्तिकस्वामी क्रीडा करीत असलेला पाहून बलिपुत्रालाहि आपण देवपुत्र बनण्याची इच्छा झाली आणि आपल्या तपस्वी भक्तांची मनीषा नेहमींच सफळ करणाऱ्या शंकरानें थोड्या फार विलंबानें ती सफळहि केली. त्यानें पार्वतीला सांगितलें : " कनीयान् कार्तिकेयस्य पुत्रोऽयं प्रतिगृह्य-ताम्।" म्हणजे "कार्तिकेयाचा धाकटा भाऊ म्हणून तूं याचा स्वीकार कर." कारण 'यत्रोत्थितो महासेनः सोऽग्निजो रुधिरे पुरे। तत्रोद्देशे पुरं चास्य भविष्यति न संशयः'. म्हणजे 'कार्तिकेयाचा उदय ज्या रुधिरपुरांत झाला, त्याच देशांत याची राजधानी होईल, याविषयीं संशय नाहीं.' येथें उल्लेखिलेलें रुधिरपूर म्हणजे महा-भारतांत कार्तिकेयाला अत्यंत प्रिय म्हटलेलें रोहितक अर्थात् आधुनिक पंजाबांतील रोहटक असलें पाहिजे. सभापर्वांत नकुलाच्या दिग्विजयाचें वर्णन करतांना महा-भारतकारांनीं म्हटलें आहे : "पहिल्यानें नकुल रोहितक पर्वताप्रत प्राप्त झाला. तो रमणीय पर्वत धनधान्यधेनूंनीं संपन्न असून कार्तिकेयाला मोठा प्रिय आहे." खिस्त-कालाच्या तिसऱ्या शतकांत सहारानपूर, डेहराडून, दिल्ली, रोहटक, कांग्रा, लुधियाना इत्यादि जिल्ह्यांतून यौधेयांचीच सत्ता चालत होती, असें त्यां प्रदेशांतून यौधेयांचीं नाणीं विपुल प्रमाणांत सांपडल्यानें सिद्ध झालें आहे. यौधेय हे मुख्यतः सतलज आणि यमुना यांच्या तीरांवरील प्रदेशांत रहात असत. त्रिगर्तांची वसति विशेषतः रावी आणि सतलज यांच्या मधील प्रदेशांत होती. 'द्वि' आणि 'त्रि' या अक्षरांनीं अंकित असलेलीं यौधेयांचीं नाणीं सामान्यतः सतलज नदीच्या पश्चिमेला सांपडतात, असें डॉ. विमलाचरण लाहा यांनीं आपल्या प्राचीन भारतांतील कुलांवरील ग्रंथांत लिहिलें आहे. ही माहिती खरी असल्यास तीं नाणीं यौधेयांत समाविष्ट झालेल्या त्रिगर्तद्विगर्तांतच प्रामुख्यानें चालत असल्याचें समजून येतें आणि त्या अक्षरांचा मीं लाविलेला अर्थ खरा असल्याचें प्रत्यंतर मिळतें. असो. कार्तिकस्वामीला प्रिय असलेल्या प्रदेशांतच दिल्लीचाहि समावेश होतो. त्या नगरीच्या लग्नीं त्याच्या माता कृत्तिकाच बसलेल्या आहेत, याचा येथें उल्लेख केल्यावांचून राहवत नाहीं. ज्योतिषशास्त्रदृष्ट्या रोहितक प्रदेशावर कृत्तिकांचें आधिपत्य चालत असल्यामुळें हा विशिष्ट प्रदेश कार्तिकेयाला अत्यंत प्रिय असणें साहाजिक आहे.

## देवपुत्र या पदवीचें मूळ

कार्तिकस्वामीच्या रुधिरपुराची चर्चा संपवून आतां वरील श्लोकांतील देवपुत्राकडे वळलें पाहिजे. भारताच्या प्राचीन इतिहासांत स्वतःला देवपुत्र म्हणवून घेणाऱ्या एकमेव कुषाण घराण्याची मातृभूमि महाचीनच्या परिसरांत असल्यामुळें तेथील संस्कृति आणि महत्त्वा-कांक्षा त्यांच्या हाडींमासीं खिळल्या होत्या. आपल्या घराण्याची देवपुत्र ही पदवीहि कुषाणांनीं चीनमधूनच आणली होती. या देवपुत्र पदवीचें ऐतिहासिक महत्त्व लक्षांत न आल्यामुळें आजपर्यंत भारतीय विद्वान् बाणासुराच्या शोधाप्रीत्यर्थ इराकच्या यात्रा करीत आले आहेत. उदाहरणार्थ, 'प्राचीन भारतीय साहित्यमें पुरातन इराककी राजधानीयाँ' (विशाल-भारत, जून, १९५०) या लेखांत श्री. अमृत पंड्या लिहितात : "हरिवंशपुराणोल्लिखित बाणासुरकी राजधानी शोणितपूर या रुधिरपूर इराककी 'निनेवा' है. बाणासुर संभवतः असीरियन् राज-वंशावली का असुर बानीपाल है.' हा उल्लेख मी नागरी प्रचारिणी सभेच्या पत्रिकेवरून (२००७ सं. अंक ३) घेतला आहे. मूळ लेख मीं पाहिलेला नाहीं.








या अवतरणावरून तरी वरील लेखांत खऱ्या ऐतिहासिक संशोधनापेक्षां आपल्या कल्पनाशक्तीलाच श्री. पंड्यांनीं अधिक वाव दिलेला दिसतो. संस्कृत वाङ्मयांतील असुरांसंबंधीं असा एक सामान्य नियम घालून देतां येईल कीं, ज्या असुरांचा उल्लेख वेद-ब्राह्मणांतून आढळतो, त्यांचें मूळ इराक-इराणांत शोधणें शहाणपणाचें असलें तरी पुराणांतून शंकराच्या वरानें मदोन्मत्त झालेले जे नवीन असुर भेटतात, ते सारे वंशानें मोंगोलियन् अथवा कोलेरियन् असण्याचा आणि, त्यांचें वसतिस्थान भारताबाहेर असल्यास, तें चीनच्या परिसरांत असण्याचा संभव अधिक. हिमालयनिवासी शंकराचा हिमालयाच्या उत्तरेकडील मोंगोलियन् वंशाशीं असलेला निकटचा संबंध आजपर्यंत आपल्या इतिहाससंशोधकांच्या ध्यानांत कां आला नाहीं, मला कळत नाहीं. फार काय, शंकराच्या 'जटा' सुद्धां मोंगलच आहेत. बाबर बादशहाचा मावसभाऊ मिर्झा हैदर यानें लिहिलेल्या मोंगलांच्या इतिहासावरून असें कळतें कीं हिमालयाच्या उत्तरेकडील चिनी तुर्कस्थानांतील मोंगलांना आणि त्यांच्या देशालाहि जटा म्हणत असत. महाभारताच्या आरण्यकपर्वांत बद्रिकाश्रमाजवळ पांडवांना आणि द्रौपदीला जटासुरानें पळवून नेण्याचा प्रयत्न केल्याचें एक आख्यानहि आहे. त्यावरून मिर्झा हैदरच्या ग्रंथांतील 'जटा' अगदीं बद्रिकाश्रमापर्यंत पसरले होते हें कळून येतें. आणि मग गंगावतरणाच्या प्रसंगीं शंकरानें गंगेला कोणत्या जटांमध्यें गुरफटून टाकलें, किंवा दक्षयज्ञविध्वंसनाच्या प्रसंगीं शंकरानें कोणत्या जटा आपटून वीरभद्राला निर्माण केलें याचा स्वाभाविक रीतीनें उलगडा होतो. हे स्वतःला जटा म्हणविणारे मोंगल वीरभद्राच्या काळीं हिंसक यज्ञविरोधक होते आणि गौतम बुद्धाच्या काळीं अहिंसेचा अभ्रा पांघरलेले यज्ञविरोधक बनले इतकेंच काय तें! वॉल्टर हॅमिल्टनच्या 'जिओग्रॅफिकल, स्टॅटिस्टिकल अँड हिस्टॉरिकल डिस्क्रिप्शन ऑफ इंडिया' या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडांतील ६६८ पानावरील माहितीवरून असें समजतें कीं, किरात, जरा, कीचक हीं सारीं नेपाळांतील मोंगोलियन् टोळ्यांचीं नांवें आहेत. यांच्यापैकीं किराताच्या रूपानें शंकर अर्जुनाशीं लढला. पांडवांच्या काळीं कीचकांनीं मत्स्य देश कसा व्यापून टाकला होता, हें सर्वांना माहीत आहेच. हे कीचक 'किप्चक' या नांवानें अजून मध्य आशियांत राहतात. मिर्झा हैदरच्या ग्रंथावरून असें समजतें कीं 'किप्चक' ही श्वेत हूणांचीच एक संज्ञा आहे. या श्वेत हूणांपैकीं भारतावर स्वारी करणारे तोरमाण आणि मिहिरगुल राजे शिवभक्त म्हणून ओळखले जातात. बुद्धाप्रमाणेंच शंकरहि यज्ञाचा आणि मदनाचा शत्रु मानला जात असल्यानें मोंगोलियन् समाजांत त्या उभयतांच्या उपासनांची स्वाभाविकपणेंच एक अद्‌भुत खिचडी बनली होती. डॉ. रघुवीर यांना त्यांच्या चीनच्या प्रवासांत बौद्धशैव पंथांच्या संमिश्रणाचा कसा साक्षात्कार झाला, हें त्यांनीं आपल्या 'सरस्वतीविहारा'च्या (कार्तिक शुक्ल प्रतिपदा, सं. २०१२) एका अंकांत वर्णिलें आहे. फार काय, पेकिंग राजधानीच्या मध्यवस्तींत अजूनहि महाकालाचें पुरातन मंदिर अस्तित्वांत असल्याचें अनपेक्षित दृश्य त्यांना तिथें पहावयास मिळालें. यावरून अशी मात्र कोणी कल्पना करूं नये कीं कोणा भारतीय सम्राटाला चीन जिंकण्याची इच्छा झाल्यामुळें त्यानें पेकिंगला आपले प्रचारक पाठवून महाकालमंदिराच्या निमित्तानें भारताच्या हितसंबंधी लोकांचें तिथें एक केंद्र निर्माण करून ठेविलें होतें! त्याच्या उलट, कुषाणमोंगलांच्या भारतावरील आक्रमणाला विशाल स्वरूप प्राप्त होण्यापूर्वीच त्यांच्या पक्षाला मिळालेल्या सनातन धर्माच्या शत्रूंनीं आपल्या देशांत मोंगलांच्या एकजटा, महाचीनतारा, उग्रतारा महानीलसरस्वती—इत्यादि देवतांची आयात करून त्यांच्या आक्रमणाची भूमिका सिद्ध करून ठेविली होती. एकजटा देवीची उपासना तर स्वतः आर्यनागार्जुनपादांनीं भोट देशांतून उद्धार करून ('आर्यनागार्जुनपादैः भोटेपु उद्धृतम्') आणली होती, असा स्पष्ट उल्लेख सांपडतो. या साऱ्या चिनी देवतांच्या प्रचारामागील भूमिका काय होती, हें कै. महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्री यांनीं कुब्जिकातंत्रांतील म्हणजे खुजा मोंगोलियन् लोकांसाठीं लिहिलेल्या एका तंत्रांतील 'गच्छ त्वं भारते वर्षे अधिकाराय सर्वतः। पीठोपपीठस्थानेपु कुरु सृष्टिमनेकधा' हा श्लोक उद्धृत करून स्पष्ट दाखवून दिलें आहे. या वचनावरून तांत्रिकांचीं महापीठें म्हणजे भारतशत्रूंचीं केंद्रें होतीं, हें रहस्य अगदीं स्फुटरहस्य झालें आहे. कनिष्कानें जालंधर देश व्यापण्यापूर्वीच










जालंधर हें तांत्रिकांचें महापीठ आणि योगिनीगण-सेवित असें देशद्रोह्यांचें एक प्रमुख केंद्र बनलें होतें, हें पद्मपुराणांतील वर उतरून घेतलेल्या श्लोकांवरून स्पष्ट झालेंच आहे. या साऱ्या गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे श्री. अमृत पंड्यासारख्या अभ्यासकांना सहज कळून येईल कीं, हरिवंशादि पुराणांतून बाणाला असुर म्हटलें असलें तरी त्याच्या राजधानीच्या शोधासाठीं इराकला जाण्याची फारशी आवश्यकता नाहीं. बाणासुराच्या राजधानींत पीतवर्णाचें प्राबल्य होतें, ही गोष्ट हरिवंश-कारांनीं अगत्यपूर्वक सांगितली आहे. बाणासुराच्या राजधानीला पोंचल्यावर बलरामाला 'चोंहीकडे निस्तेज ही पिवळी छटा फैलावली' असल्यानें विचित्र दृश्य दिसूं लागलें, तेव्हां त्यानें कृष्णाला विचारलें: 'सर्वे कनकवर्णाभाः संवृत्ताः स्म न संशयः। किमिदं ब्रूहि नस्तत्वं किं मेरोः पार्श्वगा वयम्॥' म्हणजे "आम्हां सर्वांवर पिवळी छटा दिसूं लागली आहे, तर आपण मेरू पर्वतासन्निध आलों आहोंत कीं काय?" तेव्हां कृष्णानें उत्तर दिलें कीं आपण बाणासुराच्या नगरीसन्निध आलों असल्यानें असला भास होऊं लागला आहे. त्याचप्रमाणें पावसाळ्याचे चार मास लोटल्यानंतर अनिरुद्ध बाणाच्या अटकेंत असल्याची वार्ता कृष्णाला कळली आणि त्यानंतर तो शोणितपुरावर चालून गेला, या भागवतांतील माहितीवरूनहि बाणाची राजधानी भारतीय आर्यांच्या नेहमींच्या युद्धक्षेत्रांत असल्याचें अनुमान निघतें. कृष्ण जेव्हां बाणासुराला मारायला सिद्ध झाला, तेव्हां ('तन्माता कोटरा नाम नग्ना मुक्त-शिरोरुहा। पुरोऽवतस्थे कृष्णस्य पुत्रप्राणरिरक्षया') बाणासुराची माता कोटरा ही पुत्राचा प्राण वांचविण्या-करितां विवस्त्र होऊन कृष्णापुढें उभी राहिली, या भागवतांतील वचनावरून बाणाची माताहि भारतीय असल्याचें कळून येतें. कारण मोंगल लोक चित्रळ आणि त्याच्या शेजारचा काफिरिस्थान या प्रदेशांना कटोर ही संज्ञा लावीत असत, असें बाबर बादशहाच्या आत्मचरित्रावरून आणि इतर अनेक ग्रंथांवरून समजतें. अल्बिरुणीनें तर कनिष्काच्या घराण्यालाच कटोर घराणें म्हटलें आहे. याचें कारण असें दिसतें कीं कुषाण साम्राज्य प्रस्थापित होण्यापूर्वीं युएची टोळी-च्या पांच शाखांचीं जीं पांच निरनिराळीं लहान लहान राज्यें होतीं, त्यांत कनिष्काच्या कुषाण शाखेचें राज्य चित्रळ आणि काफिरिस्थान याच प्रदेशांत होतें.

## राणी अनौपम्या व त्रिपुरनाश

हरिवंश आणि पद्म या पुराणांनीं बाणासुराला अनुक्रमें शोणितपूर आणि जालंधर येथील राजा म्हटलें असलें तरी मत्स्यपुराणकारांनीं त्याला 'त्रि'पुरांचें आधिपत्य अर्पण केलें आहे. कारण बाणासुर कनिष्काची एक राजधानी चीनच्या सीमेवरील मोंगोलियन् वस्तीच्या भागांत होती, दुसरी मध्य आशियांत आणि तिसरी भारतांतील त्रिगर्तांच्या प्रांतांत होती. या शेवटच्या राजधानीला अनुलक्षूनच मत्स्यपुराणकारांनीं नेहमींचें परंपरागत त्रिपुरासुराचें आख्यान अन्यत्र वर्णिलें असूनहि बाणासुराला 'त्रि'पुरांचा अधिपति बनविलें आहे. या पुराणाच्या १८७ व्या अध्यायांत नर्मदातीरनिवासी महेश्वराला ऋषि सांगतात: "अतिवीर्यो महाघोरो दानवो बलदर्पितः। बाणो नामेति विख्यातो यस्य वै त्रिपुरं महत्॥ गगने सततं दिव्यं भ्रमते तेन तेजसा। ततो भीता विरूपाक्ष त्वामेव शरणं गताः॥" म्हणजे त्रिपुरांचा अधिपति जो बाण, त्याच्यापासून या नर्मदातीरनिवासी मुनींना भय उत्पन्न झालें होतें. 'आश्वास्य स तु तान् सर्वान् नर्मदातटमाश्रितः। चिंतयामास देवेशस्तद्वधं प्रति मानद॥' तेव्हां त्या साऱ्या ऋषींना आश्वासन देऊन नर्मदातीरनिवासी देवेशानें बाणाचा कांटा कसा काढावा याचा विचार आरंभिला. शककुषाणांचें आक्रमण भारतावर चालू असतांना भारतीय शैवांचें केंद्रस्थान कैलासमानसक्षेत्रांपासून ढळून नर्मदातीरावरील दऱ्याखोऱ्यांत आलें होतें, ही ऐतिहासिक दृष्ट्या अतिशय महत्त्वाची घटना आहे. 'गणेशपुराणांतहि शंकरानें कैलासाचा त्याग करून दक्षिणेंतील त्रिसंध्या क्षेत्राचा आश्रय केल्याचा उल्लेख आढळतो. तोहि या शककुषाणांच्या आक्रमणालाच अनुलक्षून आहे. उत्तरेंतील सनातनी शैवांनीं या काळीं नर्मदातीरीं आश्रय घेण्याचें मुख्य कारण म्हणजे तिथें त्यांना दक्षिणापथांतील शैवपंथी शालिवाहन राजांचा आधार लाभत होता. 'गाथासप्तशतीं'त म्हटलेंच आहे 'आपन्नानि कुलानि द्वावेव जानीत उन्नतिं नेतुम्। गौर्या हृदयदयितोऽथवा शालिवाहननरेन्द्रः॥' शकांच्या आक्रमणानें आपन्नविपन्न झालेल्या शालि-वाहनकुलाचा गौतमीपुत्रानें पुनरुद्धार केल्यानंतर ही गाथा रचली गेली आहे, हें उघड आहे. असो.








ऋषींचें गाऱ्हाणें ऐकून देवानें नारदाला बोलावून त्याला आज्ञा केली : " गच्छ नारद तत्रैव यत्रैतत् त्रिपुरं महत् । बाणस्य दानवेंद्रस्य शीघ्रं गत्वा च तत्कुरु ॥ ता भर्तृदेवतास्तत्र स्त्रियश्चाप्सरसां समाः । तासां वै तेजसा विप्र भ्रमते त्रिपुरं दिवि ॥ तत्र गत्वा तु विप्रेंद्र मतिमन्यां प्रचोदय । देवस्य वचनं श्रुत्वा मुनिस्त्वरित-विक्रमः ॥ स्त्रीणां हृदयनाशाय प्रविष्टस्तत्पुरं प्रति । " म्हणजे बाणासुराच्या नगरींतील स्त्रियांची मति अन्यत्र प्रचलित केल्यावांचून त्याचा पराजय करतां येणार नाहीं, असें ओळखून शंकरानें नारदाला त्या कामगिरीवर पाठविलें. हा कानमंत्र घेऊन त्रिपुर-नगरीला गेलेल्या नारदानें बाणासुराची पत्नी अनौ-पम्या हिची भेट घेऊन तिला व्रतवैकल्यांच्या नादीं लावलें आणि आपलीच भक्ति करण्याचा उपदेश केला. " एवं तासां मनो हृत्वा सर्वासां तु पतिव्रतात् । जगाम भरतश्रेष्ठ स्वकीयं स्थानकं पुनः ॥ " नारदा-च्या या अगदींच किरकोळ कामगिरीमुळें अनौपम्ये-च्या पातिव्रत्याचा भंग कसा झाला, हें आमच्या अर्वाचीन वाचकांना समजणें अवघड आहे. तरीसुद्धां ' He for God only and she for God in him ' या मिल्टनच्या ' नष्टनंदनां'तील ओळीचें स्वारस्य त्यांना समजलें असलें, तर 'मत्स्यपुराण'काराच्या म्हणण्याचा आशयहि त्यांना कळूं शकेल. इतकेंच नव्हें तर अनौपम्येची जी थोडीफार माहिती उपलब्ध आहे, तिच्याशीं मत्स्यपुराणांतील आख्यान अत्यंत सुसंगत आहे. आपल्या अनुपस्थितींत आपली पत्नी परपुरुषाच्या नादीं लागली असल्याची शंका जरी सैनिकाला आली तरी तो अघाडीवर लढण्याला सर्वस्वीं निरुपयोगी होतो, असें आधुनिक मानस-शास्त्रज्ञांच्याहि आतां अनुभवाला आलें आहे. या मानसशास्त्रांतील अनुभवाचा विस्तार पद्मपुराणकारांनीं जालंधरपत्नी वृंदा हिच्या आख्यानांत केला आहे. पण नुसत्या परपुरुषाच्या चिंतनानेंच नव्हें तर परात्पर पुरुषाच्या चिंतनानेंहि स्त्रीच्या पातिव्रत्याला बाधा पोंचते, असें मिल्टनप्रमाणेंच मत्स्यपुराणकारांचेंहि मत होतें. असो. नारदाच्या उपदेशानें अनौपम्या आणि तिच्या सख्या यांची मति चळल्यानंतर शंकरानें आतां पुन्हा त्रिपुरांतक होण्याचा समय सन्निध आला असें ओळखून त्या नगरीवर बाण सोडला. त्या बाणानें आपली तीनहि पुरें जळूं लागलेलीं पाहून बाणासुर शंकराला शरण गेला. तेव्हां देवानें कृपा करून त्याचें आणि त्याच्या तीन पुरांपैकीं एकाचें संरक्षण केलें, असें मत्स्यपुराणांत सांगितलें आहे. हें आख्यान अर्थात् कुषाणकुळाच्या इतिहासावरच आधारलेलें आहे. या कुषाणांची मूळची टोळी जी युएची ती महाचीनच्या खोतान प्रांतांत नांदत असतांना तिचें हूणांशीं वैर झालें होतें. त्या हूणांनीं एका युद्धांत युएची कुळाच्या खोतान आणि मध्य आशिया या देशां-तील राजधान्यांचा संपूर्ण विध्वंस केला. तेव्हां कांहीं काळ त्यांना भारतावांचून अन्यत्र आधार उरला नव्हता. या घटनेप्रमाणेंच बाणासुराची पत्नी अनौपम्या हिचें नांव ऐतिहासिक असावें, असें वाटतें. ' सर्वतथागताधि-ष्ठानबुद्धक्षेत्रसंदर्शनव्यूहम् ' नांवाच्या एका सुप्रसिद्ध महायानसूत्रांत अनोपमा महायक्षिणीला प्राप्त झालेला मंत्र आणि तो मंत्र साध्य करून घेण्याकरितां तथागताची आराधना करण्याचा तिनें वर्णिलेला विधि सविस्तर सांगितला आहे. ( इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली, वर्ष नववें, पान ५७९ ). या अनोपमेच्या महायक्षिणी या नांवावरून ती यक्षांची राणी होती, हें उघड आहे. कुषाण घराण्याची जननी असलेल्या ज्या चिनी टोळीला तिच्या इंग्रजी अक्षर-वाटिकेवरून आपण युएची अशी संज्ञा देतो, तिलाच बौद्ध इतिहासकार ' यक्ष ' म्हणत असत. 'मंजुश्रीमूल-कल्प'कारांनीं कनिष्काच्या पूर्वजांना यक्षराजेच म्हटलें आहे. या यक्षघराण्यांतीलच एक राणी अनोपमा महायक्षिणी असली पाहिजे, हें तिच्या महा या विशेषणावरून उघड आहे आणि तिचा उल्लेख बौद्धांच्या महायानसूत्रांतून नवीन उपासनेच्या निमित्तानें येत असल्यानें एकतर ती कनिष्ककालीन असावी, नाहींतर तदुत्तरकालीन असावी, असें अनु-मान काढणें अपरिहार्य होतें. महायानसूत्रांतून अनोपमा महायक्षिणीसंबंधीं उपलब्ध होणाऱ्या माहितींत मत्स्य-पुराणांतील माहितीची भर टाकली म्हणजे ती कनिष्काचीच राणी होती, असें म्हणावें लागतें. कनिष्क प्रथम बौद्ध धर्माला अनुकूल नव्हता, अशी तिबेटी परंपरा आहे. तेव्हां मागाहून तो या महायक्षिणीच्या प्रभावाला बळी पडला असावा. कनिष्काची राजधानी जालंधर हें बौद्धयोगिनींचें महापीठ होतें हें वर आलेंच आहे.








प्रा. मु. गो. देशपांडे

# विश्वमानव इरॅस्मस्

मध्ययुगाचा अस्त आणि पुनरुज्जीवनाच्या नवीन युगाची सुरुवात ज्या निवडक, प्रमुख युरोपीय विचारवंतांच्या प्रयत्नांनीं घडून आली, त्यांपैकीं इरॅस्मस् (१४६६–१५३६) हा एक प्रमुख होय. या रॉटरडॅमच्या विद्वान् परमतसहिष्णुतेचा आणि विवेकशीलतेचा प्रचार करणाऱ्या युगपुरुषाचें ऐतिहासिक महत्त्व दिवसेंदिवस अधिकच वाटूं लागलेलें आहे. स्टीफन् झ्वाइग सारख्या प्रथितयश चरित्रकारानें असहिष्णु धर्मवृत्तीवर निश्चयात्मक परंतु सूक्ष्म चिमटे घेणाऱ्या व नवविचारांची प्रेरणा देऊन आधुनिक युरोपच्या वैचारिक उत्थापनाची सुरुवात करून देणाऱ्या या पंडिताचें अत्यंत मार्मिक, प्रभावी असें दर्शन एका चरित्रानें घडविलेलें आहे. याखेरीज ज्यांना ज्यांना म्हणून मानवतावादी दृष्टिकोनाबद्दल आस्था किंवा आकर्षण वाटतें त्यांनीं मानवतावादाचा मागोवा घ्यावयाचें ठरविल्यास त्यांना जगाच्या आधुनिक इतिहासांत या युरोपीय पंडिताची दखल घ्यावीच लागेल.

मायभूमि अशी इरॅस्मस्ला नव्हती, असें म्हटलें तरी चालेल. त्याची जन्मतारीखहि अनिश्चितच आहे, परंतु १४६६ च्या सुमारास तो जन्माला आला असावा असें म्हणतां येईल. इंग्लंडमधील मागील शतकांतील एका कादंबरीकारानें आपल्या प्रसिद्ध कादंबरीमध्यें इरॅस्मस्चा जन्म, त्या कादंबरींतील नायक व नायिका यांच्यापासून झाला असल्याचें दाखविलें आहे. पण त्यांत काल्पनिकताच अधिक आहे. तो अनौरस मुलगा होता खरा, परंतु तरीहि त्याचे पालक लवकर वारल्यामुळें या दासीपुत्राचें भरणपोषण धर्मगुरूंच्या देखरेखीखालीं होऊं लागलें. शेवटपर्यंत इरॅस्मस् हा धर्मांतील ढोंगीपणाबद्दल, असहिष्णुवृत्तीबद्दल, अनीतिमयतेबद्दल आणि अंधश्रद्धेबद्दल ओरखडे निघावेत असें लेखन करीत असला, तरी चर्चचा सेवक म्हणूनच राहिला होता. फक्त पाद्रयाचा विशिष्ट पोशाख अंगावर चढविला जाण्याची सक्ति खुबीनें त्यानें टाळली, आणि अशा रीतीनें खुद्द धर्मसंस्थेमध्यें त्यानें भरपूर आचार-व-विचार-स्वातंत्र्य अनुभविलें. त्यानें जवळजवळ सर्व युरोपभर प्रवास केला म्हटलें तरी चालेल. आपल्या आश्रयदात्यांचें मन वळवून पॅरिससारख्या विद्यापीठामधून अभ्यास करण्याची संधि त्यानें प्राप्त करुन घेतली. त्यावेळच्या वसतिगृहांतील वातावरण त्याला अप्रिय वाटलें आणि ढेकूण व पिसवा यांच्या उच्छादामुळें रात्रीची झोंप बिघडते, अशा तक्रारी त्यानें पत्रांतून केल्या असल्या तरी विद्येची उपासना त्यानें अव्यभिचारीपणें केली. त्या वेळच्या शिरस्त्याप्रमाणें त्यानें आश्रय मागणारीं पत्रें कितीतरी लिहिलेलीं आहेत. या पत्रांमुळें इरॅस्मस्च्या अंगीं कणखरपणा कमी होता असें भासतें. परंतु त्यानें स्वतः-चा लिलाव होऊं दिला नाहीं, हें आपण ध्यानीं ठेवलें पाहिजे. त्यानें आपलें स्वातंत्र्य कधींहि गमावलें नाहीं, म्हणूनच तर हॉलंड, इंग्लंड, जर्मनी, इटली व स्वित्झर्लंड असा एका देशांतून दुसरीकडे त्याला आपला तळ हलवावा लागला. वेगवेगळया विद्यापीठांची प्राध्यापकीय कामाची विनंति त्याला त्याच्या आंतरराष्ट्रीय कीर्तीमुळें त्याच्याकडे सहज चालून आली असती, परंतु असें स्वतःला बांधून घ्यावें हें त्याला बरें वाटलें नाहीं. इंग्लंडमध्यें इरॅस्मस् आला तो १४९९ या वर्षी. इंग्लंडलाच आल्यामुळें त्याला मतस्वातंत्र्य पूर्णपणें प्रगट करतां आलें, आणि इंग्लंडमधील कांहीं सन्मित्रांची व त्याची गांठ पडून मानवतावादी वृत्तीच्या धर्मप्रवण विद्वानांचा एक संघ स्थापन होऊं शकला. इंग्लंडांत इरॅस्मस् आला आणि त्याच्या अंगांतील मध्ययुगीनपणा अजिबात लोपला असें म्हटलें तरी चालेल. इंग्लंडकडे तो आकर्षिला, याचें कारण जिथें जिथें संस्कृतीची, विद्येची आणि शास्त्राची जोपासना होत होती, अशा ठिकाणीं जाणें हा त्याचा मनोधर्मच होता. परंतु तो थोडासा पुस्तकी पंडितच म्हणावा लागेल. कारण संगीताची व चित्र-








कलेची त्याला माहितीहि नव्हती आणि मातब्बरीदेखील वाटत नव्हती. ज्या ज्या देशांतून त्यानें प्रवास केला तेथल्या ग्रंथालयाशीं तो समरस झाला, पण तेथल्या लोकांशीं अथवा चालीरीतींशीं तो तितकासा समरस होऊं शकला नाहीं. तसें पाहिलें तर व्हॉल्टेअर किंवा लेसिंग यांचें वैचारिक स्वातंत्र्य किंवा पास्कल किंवा ल्यूथरची आध्यात्मिक बंडखोरी आणि हादरे देणारी शक्ति ही त्याच्या अंगीं नव्हती. इरॅस्मस्‌च्या लेखनामध्यें विद्वत्ता आणि मार्मिक विनोद यांचें मिश्रण अधिक आहे. विनोदाच्या झालरीमुळें त्याच्या लेखनाचा कांटेरीपणा चटकन् उमगतां येण्याजोगा नव्हता. पण कांहीं वेळां त्याला अतिशय बलाढ्य अशा प्रतिस्पर्ध्याशीं खंबीरपणें झगडाहि करावा लागला आहे. आणि म्हणूनच मानवतावादी विचारांचें प्रवर्तन करणाऱ्या या युगपुरुषाची महती असामान्य आहे.

त्याच्या स्वतःच्या काळामध्यें त्याला फार मोठा बहुमान लाभला असल्याचे अनेक दाखले आहेत. त्याचीं तैलचित्रें अनेक प्रसिद्ध चित्रकारांनीं रंगविलीं आहेत; इतकेंच नाहीं तर या ‘विश्वमानवा’चें तैलचित्र रंगविण्याची संधि मिळणें हा त्या त्या चित्रकारांचा बहुमान समजला जात होता. इरॅस्मस्‌चीं जीं चित्रें उपलब्ध आहेत तीं त्यानें ज्या एका लेखन-शस्त्रावर भर दिला, तें सूचित करणारीं आणि तें सन्निध असलेलीं अशी आहेत. कुणी त्याच्या शेजारीं एक पुस्तक असलेलें दाखविलें आहे, कुणी असंख्य पुस्तकें दाखविलीं आहेत, कुणी तो ग्रंथलेखन करीत असलेला दाखविला आहे, कुणी तो डाव्या हातांत दौत आणि उजव्या हातांत टांक धरून लिहीत असतांना दाखविला आहे – आणि या सर्वांतून एकच ध्वनित होत आहे कीं, नवविचारांचा प्रसार अविरतपणें करीत रहाणें हें अमोघ शस्त्र इरॅस्मस्‌ला अत्यंत प्रिय होतें. तसें पाहिलें तर हा माणूस उसळत्या रक्ताचा असावा असें कधीं दिसत नाहीं. त्याचे पातळ ओठ, बांकदार नाक, हिरव्या धमन्या दिसणारे हात लहानसर आणि जवळजवळ झांकलेले डोळे यांकडे पाहिलें तर त्यानें कधीं मोठी घोडदौड केली असेल किंवा मर्दुमकी गाजविली असेल हें शक्यच वाटत नाहीं. पण एक खोल विचार करणारा, एकाकीपणाचें जीवन कंठीत असणारा, विचेशींच ज्याचें लग्न झालें आहे असा ब्रह्मचारी कांहीं नवीन विचार ओठ घट्ट दाबून धरून, धिमेपणानें कागदावर उतरवीत आहे, असा ठसा उमटल्याशिवाय रहात नाहीं. सर्वसामान्य, अगदीं यथातथाच प्रकृति असलेल्या माणसाप्रमाणें तो थंडीच्या दिवसाबद्दलहि तक्रार करी, उष्म्यानें जिकीरीला येई किंवा शंभर मैलावर लांब कुठें प्लेगाची सांथ असली तरी घाबरून जाऊन तेथून पळ काढी किंवा अंगावर कुठें थोडीशी पुटकुळी उठली तरी बेचैन होई. असा तो होता खरा. म्हणूनच वीरपुरुषाला साजेसें वर्तन त्याच्या हांतून घडेल असें भासलें नसतें. पण त्याची काम करण्याची शक्ति मात्र जबरदस्त होती.

इरॅस्मस्‌ची विशेष प्रसिद्ध अशीं पुस्तकें थोडीं आहेत. त्यांपैकीं ‘ **इन् प्रेज ऑफ् फॉली** ’ या पुस्तकाचें महत्त्व अनन्यसाधारण आहे. ‘ इन् प्रेज् ऑफ् फॉली ’ हें उपहासात्मक असें पुस्तक असल्यानें त्यांतील विनोदमिश्रित टीका अतिशय झोंबणारी आहे. पुस्तकाची कल्पना अशी आहे कीं, राणी **मंदमति** हिनें प्राध्यापकीय प्रावरण अंगावर घेऊन, आणि डोक्यावर विदूषकाची टोपी घालून, स्वतःच्या स्तुतीला प्रारंभ केलेला आहे. तिच्या मदतनीस अशा दोन दासी म्हणजे खुषमस्करी आणि आत्मश्लाघा. राणी म्हणते : “ माझ्यावांचून जीवन अशक्य आहे. प्रजा राजनिष्ठ राहणार नाहीं, चाकर धन्याला मानणार नाहीं, मुलगा गुरूचें ऐकणार नाहीं, बायको नवऱ्याचें मानणार नाहीं. थोडक्यांत म्हणजे एकमेकांनीं एकमेकांना फसविलें नाहीं तर एकमेकांचा सहवास सुसह्य करून घेऊन जीवन जगणें अशक्यच होईल. या फसवणुकीचा प्रकार कांहीं वेळां खुषमस्करीपणाचा असेल, कांहीं वेळां शरण गेल्याच्या देखाव्याचा असेल, पण जो तो जी धडपड करीत असतो तिच्यामागें कांहींतरीं मूर्खपणा असल्यावांचून ती धडपड होणार नाहीं. व्यापारी जो धंदा करतो, त्याचें कारण पैशाची किंमत त्याला वाजवीपेक्षां जास्त वाटते म्हणून. कवि कांहीं खरडतो, याचें कारण आपण अमर होणार असें त्याला वाटतें म्हणून. योद्धा धैर्य दाखवितो, याचें कारण मोठेपणाचीं स्वप्नें तो उराशीं बाळगतो म्हणून. वास्तविक कोठेंहि कांहीं मारामारी चालू असली तर शहाण्या प्रवृत्तीचा माणूस लगेच तेथून पळ काढील. पण तसें घडत नाहीं. याचें कारण मी राणी **मंदमति** प्रत्येकाच्या डोळ्यावर








झांपड घालून त्याला जितकें अविवेकीपणानें जगतां येईल, आणि आपल्याच भावनातिरेकांत वाहून जातां येईल असें वागावयास शिकविते. माणसें धुंद होऊन वागतात, आणि म्हणूनच जीवनांत जी एक लज्जत निर्माण होते ती औरच असते! जो विकारवश होत नाहीं, त्या माणसाच्या आयुष्यांत काय राम आहे? माझ्या मतानें तर जे लोक विचारांचा स्पष्टपणा, दृष्टीची पूर्वग्रहरहितता, सरळपणा, प्रामाणिकपणा यांची तरफदारी करतात ते अगदींच मूर्ख आहेत! कारण या गुणांमुळें कडवटपणाच वाढलेला दिसून येतो. म्हणून विवेकरहितता हीच जीवनाची गुरुकिल्ली आहे." हें उपहासात्मक चित्रण दाखवितांना राणी मंदमतीनें ज्यांच्या ज्यांच्याबद्दल उद्गार काढले आहेत त्यांत शब्दांचा कीस पाडणारे वकील, विश्व जणूं काय आपल्या खिशांत आहे असें मानणारे तत्त्ववेत्ते, आपण उच्च-कुलीन आहोंत असा टेंभा मिरविणारे, पैसा खाणारे, युद्धपिपासू, जुन्या पद्धतीचे पढिक पंडित आणि लेखक, भावनेनें वाहून जाणारीं माणसें आणि प्रेमवीर यांचा समावेश होतो. यांमधून कोणत्याहि तऱ्हेचा मानवी आचरटपणाचा प्रकार सहसा सुटलेला नाहीं. वरून ही जरी थट्टा दिसली, तरी या पुस्तकानें समाजाला भयंकर ओरखडे काढले आहेत यांत शंका नाहीं, या पुस्तकांत जितकें इरॅस्मस्चें विचार-सत्त्व उतरलें आहे, तितकें त्याच्या दुसऱ्या पुस्तकांत उतरलेलें दिसत नाहीं. हें पुस्तक अतिशय स्फोटक ठरून, त्यामुळेंच धर्म-मतांच्या सुधारणेचे दरवाजे मोकळे झाले. विदूषकाच्या टोपीखालीं भयंकर टीका दडलेली लोकांच्या लक्षांत आली.

धर्मसुधारणा करण्याच्या दृष्टीनें त्यानें विधायक असें जें पुस्तक लिहिलें आहे तेंहि तितकेंच महत्त्वाचें आहे. तें म्हणजे–'The Manual of the Christian Knight' हें होय. एका वाक्यांत त्यांतील धर्मविषयक दृष्टिकोनाविषयीं सांगावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं, जिथें जिथें सत्य दिसेल तो खिश्चन धर्म होय, असें इरॅस्मस्चें मत होतें. यामुळें साहजिकच ल्यूथर, झ्विंगली किंवा काल्व्हिन् यांच्या अंगीं असलेला कडवेपणा आणि पंथाभिमान त्याला अस्वीकार्य वाटत होता. अमुक एक पंथ हाच खिश्चन धर्माला अभिप्रेत आहे किंवा अमुक पद्धतीचा, प्रार्थनामंदिरांत सांगितला जाणारा म्हणजेच काय तो खरा धर्म असें मानणें म्हणजे भिक्षुकशाही किंवा मध्ययुगीन पढिक पंडितांची अधिसत्ता अंधपणें चालू ठेवणें होय, असें त्याचें मत होतें. नवा धर्म खऱ्या अर्थानें अध्यात्मवादी आणि मानवतावादी विचारसरणीचा होता. फक्त धर्मगुरूंनींच लॅटिन् भाषेंत लिहिलेल्या धर्मग्रंथांचें वाचन करावें आणि सामान्य जनतेनें त्यांच्या मुखांतूनच तें ऐकावें, शेतकऱ्याला किंवा विणकऱ्याला तें स्वतः वाचण्याचा हक्क असूं नये किंवा संधि लाभूं नये, आणि त्याची वेगवेगळया भाषांत भाषांतरें होऊं नयेत, हें इरॅस्मस्ला जुलमीपणाचें वाटलें. ज्या सामान्य जनांच्या कळवळयानें मराठी संतांनीं संस्कृत भाषमधील आपले धर्मविचारांचें भांडार मराठी भाषिकांना मोकळें करून दिलें, तीच प्रेरणा आणि तोच कळवळा इरॅस्मस् व त्याचे समकालीन इतर मानवतावादी पंडित यांनीं दाखविला आहे. म्हणून खिस्ती धर्म खऱ्या अर्थानें कोणता आहे, हें सांगणारें इरॅस्मस्चें हें पुस्तक जसें मोलाचें आहे, तसेंच त्यानें, बायबलचें वेगवेगळया प्रचलित भाषांतून भाषांतर होण्याच्या आधीं त्याची शुद्ध प्रत तयार होणें अवश्य आहे आणि टीकेसह एक नवीन लॅटिन् भाषांतर करणें अवश्य आहे, हें जाणून असें लॅटिन् भाषेंतील भाषांतरदेखील छापून काढलें हेंहि महत्त्वाचें आहे. त्यानें मायभाषा वापरली नसली तरी त्याचा हा कळवळा कमी प्रतीचा ठरत नाहीं. इरॅस्मस्चे जे अत्यंत उल्लेखनीय असे तीन ग्रंथ ते हेच होत.

इरॅस्मस्ला ल्यूथरसारख्या बलाढ्य प्रतिस्पर्ध्याशीं झुंज द्यावी लागली. मार्टिन् ल्यूथर एक मोठा आणि ज्वलंत धर्मसुधारक होता. शेतकऱ्याच्या कुळांत जन्मलेला असून तो दणकट, धडाडीचा आणि अमाप उत्साहानें भरलेला होता. त्याच्या शब्दांशब्दांतून वादळ आणि तुफान यांची प्रचीति येत होती. तो युयुत्सु होता. उलट इरॅस्मस् त्या मानानें अगदींच कमकुवत भासणारा आणि थंड प्रकृतीचा होता. दोघांच्या मनःपिंडांमध्येंहि विलक्षण वैधर्म्य होतें. इरॅस्मस्चें मन सर्वसमावेशक होतें. तर ल्यूथरचें विश्व मर्यादित होतें. मात्र त्यांत त्याची सारी शक्ति एकवटलेली होती. इरॅस्मस्च्या शब्दांमुळें विद्वानांना विवेकशीलता प्राप्त होईल तर



अनुक्रमणिका






ल्यूथरच्या गडगडाटांतून युद्धगर्जना केल्याचा भास होईल. अशा मनःप्रवृत्तींचीं माणसें एकाच ध्येयानें प्रेरित झालीं असलीं तरी, त्यांच्यांत संघर्ष आल्याशिवाय रहात नाहीं. द्वेष किंवा सूडबुद्धि ही मानवतावादी खिश्चनधर्माचा प्रसार करणाऱ्या इरॅस्मस्ला विपरीत वाटत होती. स्वभावानेंच तो शांततावादी होता. – एवढेंच नव्हें तर संशयी किंवा चिकित्सक वृत्तीनें सर्व श्रद्धा तपासून घ्याव्यात अशी त्याची वृत्ति होती. मग तो कसा अशा प्रतिस्पर्ध्याशीं लढत बसणार ? ल्यूथरच्या अतिरेकी आणि झंझावाती धर्मप्रचाराला कांहींसा आळा बसावा आणि योग्य त्या मर्यादेनें धर्मप्रसार व्हावा अशी सूचना इरॅस्मस्नें करून पाहिली. ल्यूथर आणि इरॅस्मस् यांच्या भेटी किंवा पत्रव्यवहार फारसे झाले नाहींत. परंतु ल्यूथरनें सुरुवाती-सुरुवातीला त्याच्याविषयीं जीं पत्रें इरॅस्मस्ला लिहिलीं त्यांत इरॅस्मसविषयीं प्रशंसापर उद्गार काढले आहेत. विशेषतः ल्यूथर जेव्हां अत्यंत मोठ्या अडचणींत सांपडला होता, तेव्हां त्यानें इरॅस्मस्ला जें पत्र लिहिलें आहे, त्यांत त्यानें स्वतःकडे कमीपणा घेऊन, इरॅस्मस्चा मोठेपणा बिनशर्त मान्य केला आहे. परंतु त्यांचे संबंध फारसे निकटचे होऊं शकले नाहींत. इरॅस्मसचें म्हणणें असें होतें कीं, ल्यूथरनें भडका उडवून देतांनाहि कांहीं मर्यादा पाळाव्यात. एका बाजूनें तो ल्यूथरला सौम्यपणा सुचवीत होता, तर दुसऱ्या बाजूला पोपचेंहि मन वळविण्याचा त्याचा यत्न होता. पण जर्मनीमधल्या एका कोपऱ्यांत उठणारे सुरुवातीचे गडगडाट पोपच्या कानीं गेले नाहींत.

याच वेळीं जर्मनींत एक मोठी राजकीय परिषद् बोलविण्यांत आली होती. या ठिकाणीं ल्यूथरच्या बंडाळीचा विचार होणार होता. ल्यूथर ज्या परगण्यांतला होता, त्या परगण्याचा एक सरंजामदार प्रतिनिधि परिषदेला जात असतां वाटेंत इरॅस्मस्ला येऊन भेटला. या ल्यूथरप्रकरणीं कोणत्या बाजूनें मत द्यायचें या बाबतींत त्याला सल्ला हवा होता. मनांतून त्याला ल्यूथरनें चालविलेली धर्मसुधारणा पसंत होती. पण परिषदेंत जर राजाचें मत ल्यूथरच्या विरुद्ध असेल तरीसुद्धां ल्यूथरला पाठिंबा द्यावा काय, हा त्याच्यापुढें प्रश्न होता ! तसें करायला हरकतहि नव्हती, कारण लष्करी दृष्ट्या राजा तर कमकुवतच होता. पण इतकें करायचें तर या धर्मसुधारक ल्यूथरचा पाठीराखेपणा करण्याएवढा ल्यूथर हा नवीन धार्मिक सुधारणा घडवून आणणारा होता किंवा नाहीं हें त्याला समजून घ्यायला पाहिजे होतें. असें मत ल्यूथरविषयीं इरॅस्मस्शिवाय कोण देऊं शकणार होता ? म्हणून वाटेंत मुद्दाम थांबून या सरंजामदारानें मध्यस्थामार्फत इरॅस्मस्चें मत अजमाविलें. पण स्पष्ट 'होय' किंवा 'नाहीं' असें सांगून टाकण्याचें इरॅस्मस्च्या स्वभावांत नव्हतें. शिवाय कोणतेंहि उत्तर दिलें तरी त्यांत इरॅस्मस्ला धोकाच दिसत होता. इरॅस्मस्च्या 'हो' किंवा 'ना' वरच ल्यूथरचें भवितव्य अवलंबून होतें. ५ नोव्हेंबर, १५२० हा तो निर्णायक दिवस होता. युगप्रेरणेला डावलूं नये असें दोन्ही बाजूनीं कांहीं विचार मांडून इरॅस्मस्नें सूचित केलें, आणि या प्रश्नाची एवढी घिसाडघाई न करतां दोन्ही बाजूच्या मंडळीकडून तो चर्चिला जावा, असें त्यानें सुचविलें. ६ नोव्हेंबरला फ्रेड्रीकनें 'इरॅस्मस्चीं पुस्तकें एवढ्यांत जाळूं नका आणि चौकशी-समिति नेमा' असें सांगितलें. ल्यूथर मात्र निर्भय होता. त्यानें दुसऱ्या दिवशींच्या सभेमध्यें छातीठोकपणें आपलें प्रतिपादन मांडलें. यावेळीं इरॅस्मस् सभेस आला नाहीं. तो आपल्या अभ्यासांतच निमग्न होता. पण इतिहासांतल्या या अत्यंत निर्णायक क्षणीं गैरहजर राहिल्यानें, इरॅस्मसनें स्वतःला अत्यंत प्रिय असलेल्या सहिष्णुताप्रधान धर्माचा दीर्घकालपर्यंत घात केला ! आणि ल्यूथरचा प्रॉटेस्टंट कडवा मार्ग मात्र शिल्लक राहिला. पन्नाशींत आलेल्या इरॅस्मस्नें या पुढें स्वतःला केवळ पुस्तकांतच गाडून घेतलें. त्यामुळें कांहीं लोक त्याला ल्यूथरच्या बाजूचे समजूं लागले, तर कांहीं लोक त्याला पोपच्या बाजूचे समजूं लागले. जिकडे तिकडे त्याच्याविरुद्ध निदर्शनें होऊं लागलीं. त्याचें स्वास्थ्य अजिबात नाहींसें झालें. त्या ऐतिहासिक महत्त्वाच्या क्षणीं धैर्यानें इरॅस्मसनें कोणती तरी एक बाजू घेणें आवश्यक होतें. पण इतर सद्गुण असले तरी धैर्य हें त्याच्याजवळ नव्हतें !

साहजिकच सबंध गांव त्याचा द्वेष करूं लागला. नंतर हा भटकणारा ब्रह्मचारी पंडित आपल्या मोजक्या वस्तू बरोबर घेऊन पुन्हां गांवोगांव हिंडूं लागला. या

झगड्यापासून अलिप्त असलेल्या स्विझर्लंडमध्यें तो गेला. बासल् येथें कितीतरी वर्षें तो राहिला. इथें त्याला जसें पाहिजे तसें वातावरण होतें. इथलीं त्याचीं आठ वर्षें हीं अत्युत्तम लेखनाचीं अशीं वर्षें म्हणतां येतील. इथेच प्रख्यात चित्रकार होलबिन् आणि मुद्रक फ्रोबिनियस् त्याला भेटले. इरॅस्मस् एक छापखान्यांत तरी असायचा, नाहींतर त्याच्या राहत्या घरीं झुम् लफ्ट ' Zum Lufft ' येथें तरी असायचा. वास्तविक इरॅस्मसनें सुरूं केलेला झगडा हा आज-तागायत चालूंच आहे. कुठलाहि पक्ष न घेता स्वतंत्रपणें विचार मांडणारा माणूस समाजाला नकोसा झालेला आहे. माणसें आपल्या बाजूचीं तरी असलीं पाहिजेत, किंवा विरुद्ध तरी असलीं पाहिजेत, असा ठोकळ समज आज रूढ आहे. इरॅस्मस्च्या शक्तीविषयीं आणि प्रभावाविषयीं दोन्ही बाजूंना संशय नव्हता, आणि म्हणून आपापल्यापरीनें दोन्हींकडूनहि त्याला पत्रें येत होतीं कीं, या अत्यंत आणीबाणीच्या प्रसंगीं त्यानें पुढाकार घेऊन आपल्या बाजूचें समर्थन करावें! ल्यूथरच्या पक्षांतील - म्हणजेच धर्मसुधारणावाद्यांची फार मोठी अपेक्षा होती कीं, ल्यूथरनें चालविलेला लढा पुढें इरॅस्मस् चालवील! आणि पोपच्या बाजूनेंहि त्याच्या विनवण्या सारख्या चालूच होत्या. पण त्याचा समन्वयवाद दोन्ही पक्षांना समजण्यासारखा नव्हता. निर्णायक असें कांहीं न लिहितां समन्वय सुचविणारीं पत्रें तो लिहीत राहिला. बहुतेकांना तो असें थोपवूं शकला. पण धर्म-सुधारणेला इरॅस्मस्ची नक्की मदत मिळावी याकरितां एका हुटेन नांवाच्या तरुणानें त्याचा पिच्छा पुरविला. वास्तविक हुटेन हा त्याचा पूर्वीचा शिष्य होता, आणि त्यांचे संबंध अत्यंत जिव्हाळ्याचे होते. तरुण हुटेनला राजकीय जहालपणामुळें कोठेंहि थारा नव्हता. पूर्वी कविता करणारा आणि आज राजकारणांत आवेशानें शिरलेला हा ल्यूथरचा अनुयायी असेल तिथून शोधून काढावा आणि त्याला शिक्षा द्यावी असे हुटेनच्या बाबतींत हुकूम सुटले होते. हुटेन इरॅस्मस्चाहि निस्सीम भक्त होता. पण इरॅस्मसनें त्याला आश्रय दिला नाहीं. कारण कोणत्याहि बाजूला हिरीरीनें पडायचें नाहीं, या इरॅस्मस्च्या वृत्तीला त्यामुळें बाध येणार होता. पण हें खरें कारण स्पष्ट न सांगतां इरॅस्मसनें ' मला मूतखडा झाला आहे, पोटशूळा-ची व्यथा आहे, ' अशा स्वतःच्या हजारों सबबी सांगितल्या व हूटेनला घरांत थारा दिला नाहीं. पूर्वी या तरुणानें जेव्हां कविता केल्या होत्या, तेव्हां इरॅस्मस त्याला डोक्यावर घेऊन नाचला होता! पण आज मात्र तो त्याला अगदीं नकोसा झाला होता! हूटननें अखेर तें गांव सोडून झूरिच् येथें झ्विंगलीचा आश्रय गांठला, आणि मरण्यापूर्वी इरॅस्मसच्या तत्त्व-च्युतीबद्दल आणि भीरुतेबद्दल कडकडून लिहिलें. पोकळ धर्मसुधारक म्हणवून घेण्यापेक्षां उघडउघड पोपचा पाठी-राखा असें सरळ सरळ इरॅस्मसनें म्हणवून घ्यावें, अशी त्यानें इरॅस्मसची निर्भर्त्सना केली. पण त्याबरोबरच 'तें इरॅ-स्मस्ला शक्य नाहीं, कारण पूर्वीचा इरॅस्मस् हा आमचा-च होता' हेंहि त्यानें म्हटलें. या हल्ल्यामुळें मात्र इरॅस्मस् थोडा डगमगला, यांत कांहीं शंका नाहीं. हुटेनच्या या हल्ल्याला उत्तर म्हणून त्यानें लांबलचक प्रत्युत्तर दिलें. त्या उत्तरांतच त्याची व्यक्तिवादी विचारसरणी उत्तम रीतीनें प्रकट झाली आहे. तो म्हणतो : ' मी स्वातंत्र्याचा भोक्ता असून मला कुठल्याहि पक्षाची तरफदारी करतां येणार नाहीं, किंवा पक्षाशीं अंध-निष्ठा दाखवितां येणार नाहीं. ' अशा रीतीनें इरॅस्मस्-ला उत्तर देणें भागच पडलें व ल्यूथरचा आणि त्याचा सामना सुरूं झाला.

हा झगडा म्हणजे श्रद्धा, अनुयायित्व यांविरुद्ध विवेक-शक्ति, विचक्षणपणा आणि स्वातंत्र्य यांमधील झगडा होता. येथूनच कडवे धर्मसुधारक आणि मानवतावादी धर्मसुधारक यांच्यांतील भेद जगजाहीर झाला. या रणधुमाळीनंतरहि समन्वयवादी दृष्टिकोन यशस्वी होण्याचीं चिन्हें निर्माण झालीं होतीं. मागें ज्याप्रमाणें एक परिषद् भरविण्यांत आली होती, तशीच दुसरीहि एक परिषद् भरविण्यांत आली. या परिषदेचा सूर वास्तविक समन्वयवादीच होता. कारण दरम्यानच्या अनुभवानें आणि सुधारणावादी पक्षांत वेगवेगळ्या प्रवृत्तींचे लोक शिरल्यानें, ल्यूथरचा पूर्वीचा जोम ओसरला होता. पुराणमतवाल्यांनाहि समन्वय हवा होता. ल्यूथर हजर न राहतां त्याच्या बाजूनें अधिक चतुर असा मेलॅन्कथॉन् हा हजर रहाणार होता. तो सौम्य प्रकृतीचा, उदारधी असा ल्यूथरचा सहायक होता, आणि इरॅस्मस्चाहि निष्ठावान् शिष्य होता. या सभेला हजर राहण्यासाठीं इरॅस्मस्ला खास आमंत्रण










देण्यांत आलें होतें. पण येथेंहि त्यानें पूर्वीचीच वृत्ति धारण करून तो गैरहजर राहिला. ध्येयासाठीं शिरकमळ हातीं घेण्याची प्रेरणा त्याला कधीं झालीच नाहीं. दोन्ही बाजूंच्या लोकांना त्यानें पत्रें लिहिलीं खरीं. पण तो प्रत्यक्ष मात्र हजर नव्हता. साहजिकच सभेंत फुटीरपणा बळावला आणि सहिष्णुतावाद, संयम, समन्वयवाद, व्यक्तिवादी विचारसरणी या इरॅस्मियन् विचारांचा लोप झाला. वृद्धावस्थेंत, जीवितध्येय म्हणून जपलेल्या मानवतावादी ध्येयाचा चुरगळा झालेला तो पहात होता. त्याचे बरोबरीचे इतर सहकारीहि बळी पडले होते किंवा धारातीर्थी पतन पावले होते. जिकडे तिकडे थैमान घातलें जात होतें. म्हणून इरॅस्मसला वाटत होतें कीं, ‘ आपलेंहि हृदय जणुं कांहीं बंद पडलें आहे. आतां यापेक्षां आणखी वृद्धावस्थेंत दिवस काढणें शक्य नाहीं. ’ पण तरीहि सत्तरीच्या घरांत आलेल्या या पंडिताला आणखी एकदां गांव सोडावें लागलें. वास्तविक मायभूमि अशी त्याला कधीं नव्हती, तरीहि अखेरच्या दिवसांत ही थकलीभागलेली कुडी जेथें जन्म पावली तेथें जाण्याची मनीषा बाळगून मार्ग क्रमूं लागली. पण त्याची मनीषा पुरी व्हायची नव्हती. बायकांच्यासाठीं सर्वसाधारणपणें उपयोगांत आणल्या जाणाऱ्या लहानशया गाडींत बसून तो जाऊं लागला. पण वाटेंत अतिशय बर्फ पडलें. प्रवासांत बासल् येथेंच त्याचा मुक्काम पडला होता. तेथील स्निग्ध वातावरणांत फिरून त्याचें मन रमून गेलें. अखेरच्या दिवसांत जगानें आपली उपेक्षा केली, असें त्याला वाटलें. कारण त्याला आतां कोणीहि सल्ला विचारीत नव्हतें. अशा या अखेरच्या दिवसांत एक विलक्षण विस्मयजनक पत्र त्याला मिळालें. अतिशय आदरपूर्वक आणि प्रेमानें तें लिहिलें होतें ! त्यांत म्हटलें होतें : ‘ मीं जें जें कांहीं करतों, माझा जो मनःपिंड बनला आहे तो सर्व आपण घडविलेला आहे. प्रांजलपणें मी अशी कबुली दिली नाहीं, तर मीं कृतघ्न ठरेन. सत्याचा अजिंक्य उपासक आणि कलांचा प्रोत्साहक म्हणून आपण मला अतिशय वंदनीय आहांत.

– आपला नम्र रॅबेल. ’

असेंच दुसरें एक पत्र इरॅस्मसला आलें. तें उघडतांच त्याच्या पातळ ओठांतून एक तिरस्कारयुक्त स्मित बाहेर पडलें आणि त्यानें तें पत्र फेंकून दिलें. कारण त्या पत्रांत असें होतें : “ नवा पोप त्याला कार्डिनलची तांबडी टोपी, भरपूर पैसे मिळतील अशी एखादी अधिकाराची जागा सप्रेम भेट म्हणून देऊं करीत होता ! ”. इरॅस्मस् म्हणत होता : ‘ मला कार्डिनलची टोपी कशाला हवी ? मी स्वातंत्र्याचा उपासक आहे. एक नागरिक या नात्यानें मिळणारें स्वातंत्र्य मला पुरें आहे.’ असे वृद्धावस्थेंतील दिवस कंठीत आणि अखेरपर्यंत काम करीत, ज्ञानाचे श्वास घेत आणि ज्ञानाचेच उच्छ्वास बाहेर टाकीत, अत्यंत शांत चित्तानें तो निधन पावला. मरतेसमयीं एक थोडासा विस्मय वाटणारी अशी गोष्ट घडली. घशाला घरघर लागली असतांना, ज्यानें जन्मभर लॅटिनमध्येंच लिहिलें आणि लॅटिनमध्येंच विचार केला त्या या विद्वानानें बालपणचे अगदीं सुरुवातीचे जे डच मातृभाषेंतील बोल होते त्यांत ‘ हे ईश्वर, ’ असें म्हटलें व तो मरण पावला.

इरॅस्मसच्या ‘ In praise of folly ’ या ग्रंथाच्या स्वरूपासंबंधीं वर संक्षेपानें माहिती दिलीच आहे आणखी दोन पुस्तकांसंबंधीं थोडक्यांत कांहीं माहिती दिल्यास ती उपयुक्त होईल. त्यांपैकीं पहिलें, ‘मॅन्युअल् ऑफ दि खिश्चन नाइट (Knight)’ हें पुस्तक सोप्या वादविवादरहित अशा पद्धतीनें खिश्चन धर्माचें सारतत्त्व सांगणारें असें आहे. यांत एकंदर बावीस नियम खिश्चन माणसाच्या वर्तणुकीसाठीं म्हणून दिले असून ते पुराणांतील किंवा ग्रीक व लॅटिन् वाङ्मयांतील दाखले देऊन थोडक्यांत विशद केलेले आहेत. सर्वसाधारणपणें जो उणेपणा किंवा जे दुर्गुण मनुष्याच्या अंगीं निर्माण होतात, त्यासंबंधीं हे २२ नियम आहेत. खेरीज काम, क्रोध, लोभ, दंभ आणि सत्तेची हाव या विशिष्ट दुष्प्रवृत्तींना काबूंत राखण्यास काय करावें यासंबंधींहि मननीय उपदेश केला आहे. त्यावरून इरॅस्मसच्या सुसंस्कृतपणाची आणि शालीनतेची व खऱ्या धर्मप्रवृत्तींची ओळख निःसंशय होते. सर्वसामान्य जनतेसाठीं धर्माचें सारतत्त्व काढून द्यावें या कल्पनेनें इ. स. १५०१ च्या सुमारास त्यानें हें छोटेसें पुस्तक लिहिलें, आणि १५१८ मध्यें तें प्रसिद्ध करतांना त्याच्या अर्पणपत्रिकेंत “आज पढिक पंडितांत वितंडवाद माजले आहेत, स्वतःस धर्मगुरू म्हणवून मिरविणारे लोक












लोभी व असहिष्णु बनले आहेत, त्यांची नीतिमत्ताच खालावली आहे, " अशा वेळीं सामान्य जनाच्या आकलनशक्तींत असलेलें पुस्तक लिहिण्याची आवश्यकता किती तीव्रतेनें भासत होती, हें थोडक्यांत सांगितलें आहे. या पुस्तकाच्या प्रेरणेमुळेंच खऱ्या धर्माची ओळख सामान्य जनतेला झपाट्यानें होऊं शकली. पण इरॅस्मस्‌ची प्रतिभा मात्र विशेषत्वानें कुठें रंगत असेल तर ती त्याच्या खुमासदार अशा **'फॅमिलिअर कोलोक्वीज्'** या छोट्या छोट्या संवादाच्या पुस्तकांत होय. मानवी जीवनांतील विविध नमुने येथें चातुर्यानें, उपरोधपूर्णतेनें पण शेवटीं धर्माची खरी ओळख करून देण्याच्या हेतूनें मांडलेले आहेत. हे संवाद अत्यंत चटकदार, वस्तुस्थिति-निदर्शक आणि संसारांतील कोणत्याहि परिस्थितीमध्यें उद्‌भवूं शकतील असे आहेत. उदा०– एक महिन्याची बाळंतीण असलेल्या अशा एका स्त्रीचा संवाद इरॅस्मस्‌नें दिलेला आहे. हा खूपच प्रदीर्घ आहे. यांतली सुरुवातीची चर्चा, पुरुष श्रेष्ठ कीं स्त्री श्रेष्ठ, ही आहे. त्यांतला खालील संवाद पहा :

**युट्रापिलस्** – सर्वसाधारणपणें पुरुष स्त्रियांपेक्षां धष्टपुष्ट असतात.

**फॅबुला** – पण उंट तर त्यांच्याहूनहि बलवान् असतात.

**युट्रा०** – पण देवानें पुरुष अगोदर निर्माण केले आहेत.

**फॅ०** – म्हणूनच ख्रिस्त ॲडमनंतर जन्मला. नंतरची कलाकृति ही केव्हांहि श्रेष्ठ ठरते !

**युट्रा०** – परंतु देवानें स्त्रीला पुरुषाच्या हुकुमती-खालींच ठेवलें आहे.

**फॅ०** – हुकमत चालवतो म्हणून पुरुष श्रेष्ठ ठरत नाहीं. खरा दुर्बळ कोण ? जो शरण जातो तो कीं ज्याला शरण जातो तो ?...

इरॅस्मस्‌च्या या संवादावरून एक विशेष गोष्ट लक्षांत येते ती ही कीं, गेल्या ४०० वर्षांत काळ झपाट्यानें पालटला आणि आजच्या समस्या कांहीं वेगळ्या आहेत असें जें आपण सवंगपणानें मानतों तें यंत्राच्या आगमनापुरतेंच बहुशः खरें असून, इतर बाबतींत इरॅस्मस् हा आजच्या इतकाच आधुनिक आहे असें म्हटलें पाहिजे. या बाळंतिणीच्या संवादांतील पुढील उपहासात्मक थोडासा भाग पहा :

**युट्रापिलस्** : तो तुझा मुलगा कुठें आहे ?

**फॅबुला** – शेजारच्या खोलींत.

**युट्रा०** – एक महिन्याचें पोर अन् शेजारच्या खोलींत ? हा काय चमत्कार आहे ?

**फॅबुला** – तो आपल्या दाईजवळ आहे.

**युट्रा०** – म्हणजे आईव्यतिरिक्त आणखी दाई आहे कीं काय ?

**फॅ०** – ती हल्लींची फॅशनच आहे. !

यानंतर पुढें जो संवाद आहे, त्यांत स्वतःचें स्तनपान देणाऱ्या मातेची महति अतिशय बहारीनें व अतिशय तन्मयतेनें पण खुमासदार संवादांत गायिलेली आहे.

शिकारी, रणांगणावर लढणारे शिपाई, मेजवान्या झोडणारे उमराव, पश्चात्ताप झालेल्या प्रेमिका-प्रेमिक, विवाहानंतर कुढणाऱ्या बायका, वेश्या, विदुषी स्त्रिया, कवि, वैद्य, भिकारी, मासे खाणारी मंडळी, वैयाकरणी, विजोड दांपत्य, ढोंगी माणसें, कायदे-मंडळ स्थापणाऱ्या स्त्रिया, कद्रू माणूस, खादाड – अशा अनेक तऱ्हेच्या स्त्री-पुरुषांचीं अनेक मनोरंजक संभाषणें, आणि त्या संभाषणांतून जीवितांतील क्षुल्लक किंवा गंभीर अशा प्रत्येक प्रश्नावर अगदीं आज देखील रोचक वाटणारी चर्चा इरॅस्मस्‌नें केली आहे. चिक्कू माणसाची गंमतीदार टिंगल इरॅस्मस्‌नें केली आहे. एक कंजूष शेट रोजचं लागणारं गव्हाचं पीठ – अगदीं निकृष्ट प्रतीचं व जें कोणीहि घेणार नाहीं – तें घ्याय-चा. तें काळपट दिसायचं. त्याचा काळपटपणा घाल-विण्यासाठीं गव्हाच्या पिठाच्याच रंगाचा जो खडू मिळतो तो तिसरा हिस्सा या प्रमाणांत मिसळून तें पीठ वापरायचें ! किंवा काटकसर करण्याची त्याची दुसरी एक युक्ति होती. ती म्हणजे स्वतःला लागणा-ऱ्या पाव-रोट्या तो घरींच करायचा. त्याहि महिन्यांतून दोनदांच ! मग दगडासारख्या झाल्या तरी बेहेत्तर ! एखादे वेळीं पाहुणे घरीं आले म्हणजे पोटदुखीच्या सबबीवर हे राजश्री ! 'आपल्याला जेवायचें नाहीं' असें सांगायचे. मग पाहुणे कसे जेवणार !

दफनविधीसंबंधीं इरॅस्मस्‌च्या उपरोधाचा नमुना पहाण्यासारखा आहे :








मृत्युपंथाला लागणाऱ्या जॉर्ज नांवाच्या एका मित्राच्या शय्येजवळ जमलेल्या दहाबारा डॉक्टरांनीं अगोदर फीचा तगादा लावला. पैसे मिळाल्यानंतर या डॉक्टरांनीं सांगितलें कीं, "आतां त्याला सद्‌गति मिळावी म्हणून धार्मिक विधि करायचे ते करून घ्या. कारण तो थोड्याच क्षणाचा सोबती आहे." त्याबरोबर जॉर्ज हताशपणानें त्यांच्याकडे पाहूं लागला. तेव्हां डॉक्टर म्हणाले, 'डॉक्टर म्हणजे कांहीं देव नाहीं. आम्ही माणसें-च आहोंत. आम्हीं आतां दुसऱ्या खोलींत रोग नेमका कोणता आहे ते ठरविण्यासाठीं थांबतों!" दुसऱ्या खोलींत त्यांचें जोरजोरानें भांडण सुरूं होतें. एक म्हणतो 'जलोदर आहे.' दुसरा म्हणतो 'वात-विकार आहे.' तिसरा म्हणतो 'आंतड्यांत दोष आहे.' – यानंतर त्यांनीं त्याच्या मृत्यूनंतर त्याचें शवविच्छेदन करण्यासाठीं त्याच्या बायकोजवळ परवानगी मागितली. इतक्यांत वेगवेगळ्या पंथाचे धर्मगुरू दाराशीं येऊन ठेपले. एकमेकांना ते 'गद्धे' म्हणून शिव्या देऊं लागले. कोणी वहिवाट तर कोणी पांडित्य सांगूं लागला. एकमेकांची नालस्ती करतांना प्रत्येकानें ठेवलेल्या बायकांचा पण त्यांत उद्धार झाला. अखेर आजारी माणसाला तें सहन न होऊन, हात वर करून तो सर्वांना शांत राहावयास सांगतो. पण भिन्न संप्रदायाचे जमलेले लोक! त्यांच्यांत शांतता कसची राहणार? जातां जातां इरॅस्मस्‌नें या मृत्युपंथास लागलेल्या माणसानें संपत्ति कशी जमा केली होती व म्हणून त्याच्या भोवतीं या माशा कशा घोटाळत होत्या, तें सांगतांना म्हटलें आहे: "या जॉर्जला गणित फार चांगलं अवगत होतं. जिथं फक्त सात हजार शिपाई होते तिथें तो तीस हजारांचा हिशोब करायचा. शिवाय सात हजारांपैकीं कांहींचे पैसे तो देतच नसे. शिवाय तो मुद्दाम लढाई लांबवायचा आणि मित्रांकडूनहि पैसे उकळायचा व शत्रूकडूनहि पैसे उकळायचा." धर्माच्या नांवाखालीं चाललेल्या दांभिकतेची इरॅस्मस्‌ला भयंकर चीड आली होती. म्हणूनच त्याच्या लेखणीला उपरोधाची एवढी धार चढली आहे.

एका भिकाऱ्यांच्या संवादांत भिकाऱ्यांच्या एका अजब कलेचें मार्मिक वर्णन इरॅस्मस्‌नें केलें आहे. दोन भिकाऱ्यांपैकीं एकानें भीक मागण्याचें सोडून देऊन आणि भीक मागण्याच्या धंद्यांपैकीं खिसेकापूपणाचा शिरस्ता सोडून देऊन, सोनें आणि चांदी मिळवून देण्याच्या भूलथापा मारण्याचा धंदा सुरूं केला आहे. इरॅस्मसनें जीं सामाजिक शब्दचित्रें रंगविलीं आहेत त्यांत त्राटिकेसारख्या स्त्रिया, दांभिक धर्मगुरू, खुशाल-चेंडू माणसें इत्यादि असून त्यावरून या ब्रह्मचारी विद्यापूजकाला जगाची रीत आणि सर्व थरांतील माणसांची खरीखुरी ओळख कशी झालेली होती, हें पाहून कौतुक वाटतें. कांहीं वेळां इरॅस्मस्‌चा उपरोध इतका तीव्र ज्वलंत होतो कीं, पाजी धर्मगुरूविषयीं बोलतांना तो म्हणतो, "त्यांना 'फादर्स' म्हटलें जातें, आणि 'लग्न न करूं इच्छिणारी तरुण स्त्री' या संवादांत त्या शब्दाची सार्थता सिद्ध होते."

युद्धें लढण्याचा मूर्खपणा माणसानें टाळला पाहिजे. खोटा देशाभिमान, अतिरिक्त भाषाभिमान यांमुळें एकमेकांतील निर्माण झालेला द्वेष आणि कलह इरॅस्मस्‌-सारख्या 'विश्वमानवाला' बालिशपणाचे वाटत. ज्यानें शांततावादाचा अव्याहत पुरस्कार केला असा इरॅस्मस् हा पहिला साहित्यसेवक म्हणतां येईल. "जनावरें जर अशीं एकमेकांवर तुटून पडलीं तर तें क्षम्य आहे. पण माणसें युद्धाला प्रवृत्त होतात, हें मीं समजूं शकत नाहीं" असें तो म्हणत असे. आपण म्हणतों, 'न्यायासाठीं आमचें युद्ध आहे.' परंतु सत्य आणि न्याय यांना अनेक बाजू असतात. म्हणून त्यांच्या प्रस्थापनेसाठीं युद्ध करणें हें केव्हांहि गर्हणीय आहे, असें त्याचें म्हणणें होतें. संकुचितपणा आणि द्वेष यांचा इरॅस्मस्‌ला अतिशय तिटकारा होता. मनुष्याच्या अंगीं रागद्वेषांचे ज्वालामुखी आहेत, म्हणूनच तर भडका होऊं नये यासाठीं ज्यायोगें भेदाभेद होईल अशी शिकवणूक न देतां, ज्यानें सर्वांमध्यें सलोखा निर्माण होईल, अशीच शिकवणूक दिली पाहिजे, कोणतेंहि मत मांडण्याची मुभा दिली पाहिजे, असें त्याचें मत होतें. विरोध झाला म्हणजे शत्रुत्व आलें हें मानणें कोत्या बुद्धीचें लक्षण आहे, असें इरॅस्मसचा मानवतावाद शिकवितो.










# मानवाच्या सज्जनतेवरील निष्ठा

आज महात्मा गांधींची पुण्यतिथि आहे. जीवनाच्या अंतकालापर्यंत आपल्या निष्ठेवर स्थिर राहाणाऱ्या पुरुषाचें जीवन सफल होतें, असें म्हणतात. गांधीजींच्या जीवनांत केवळ मरणापर्यंतच नव्हे तर प्रत्यक्ष मरणांतदेखील त्यांनीं आपली जीवननिष्ठा स्थिर ठेविली, हें त्यांच्या जीवनसाफल्याचें विशेष कौतुक होय. म्हणून गांधीजींची पुण्यतिथि ही त्यांच्या जीवननिष्ठेची जयंतीच समजली पाहिजे. गांधीजी आपणाला सत्याचे उपासक समजत. अहिंसेच्याच द्वारें जीवनांतील सत्याची प्राप्ति होऊं शकते असा त्यांचा जीवनसिद्धान्त होता. म्हणून ते आपणांला अहिंसेचे पुजारी असेंहि समजत. अहिंसेच्या द्वारा जीवन-सत्याचा शोध या मार्गाला त्यांनीं सत्याग्रहमार्ग असेंहि संबोधलेलें आढळतें. गांधीजींच्या या सत्याग्रह-मार्गाचें स्वरूप थोडक्यांत सांगण्याचा मी आज अल्पसा प्रयत्न करणार आहे.

## मनुष्य मुळांत सज्जन

माझ्या दृष्टीनें गांधीजींची सत्याग्रहनिष्ठा म्हणजे मनुष्यमात्राच्या मूलभूत सज्जनतेवरील श्रद्धा होय. माणूस मूलतः सत्प्रवृत्त असतो. त्याचा मूळ स्वभाव सज्जनपणांत आनंद मानणारा असतो. असा विश्वास हा गांधीजींच्या सत्याग्रह-दर्शनाचा गाभा आहे. अज्ञानानें, लोभानें आणि मोहानें माणसाच्या या मूलभूत सज्जनतेवर आवरणें येतात आणि त्याच्या स्वाभाविक सत्प्रवृत्ती प्रगट होण्याला अडथळा निर्माण होतो. इतकेंच नव्हे तर नाना प्रकारच्या विकृतीहि त्याच्या चित्तांत निर्माण होतात आणि तो अत्यंत दुष्टपणाच्या प्रवृत्तींत कित्येकदां गढलेला आढळतो. स्वच्छ जलाशयावर जसें शेवाळ माजावें तशीच माणसाच्या चित्ताची स्थिति झालेली असते. शेवाळ काढून टाकलें, कचरा दूर केला म्हणजे पाण्याचें शुद्ध रूप दिसूं लागतें. त्याप्रमाणें माणसाच्या मनांतील अज्ञान आणि विकृत भावना दूर करतां आल्या तर माणसाच्या अंगची स्वाभाविक सज्जनता प्रभावीपणानें प्रगट झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी गांधीजींची दृढ श्रद्धा होती. तसें पाहिलें तर माणसाच्या सुधारणेचा मार्ग उपदेशिणारे सर्व विचारवंत अशी श्रद्धा बाळगतातच. कारण माणूस मुळांतच दुष्ट असेल तर त्याला सुधारण्याची आशा नाहीं. सारें शिक्षणशास्त्र या श्रद्धेवरच काम करीत असतें. जगांतील सर्व धर्म हाच सिद्धान्त मानून आपल्या कार्याला प्रवृत्त झालेले आढळतात. आणि म्हणूनच आपण कांहीं नवेंच सांगत आहोंत असा गांधीजींचा दावा नसे. जीवनाचें सनातन सत्यच मी आचरण्याचा प्रयत्न करीत आहे असें ते नेहमीं म्हणत.

गांधीजींच्या प्रयत्नाचें वैशिष्ट्य म्हणून असें सांगतां येईल कीं, त्यांनीं जीवनाच्या सामाजिक क्षेत्रांत या सनातन सत्यांचा वापर करण्याचें आग्रहानें ठरविलें. अलीकडच्या काळांत मानवसमाजांत जे राजकीय व आर्थिक अन्याय विशाल प्रमाणांत वाढले आहेत त्यांच्याविरुद्ध अन्यायपीडितांना लढण्याची शिकवण देतांना गांधीजींनीं मानवाच्या मूलभूत सज्जनतेवर सर्वांत अधिक भर देण्याचें काम केलें. आधुनिक जगाला गांधीजींची ही फार मोठी देणगी समजली पाहिजे.

माणूस हा कांहीं एकटा जन्माला येत नाहीं, एकटाच आपलें जीवन जगूं शकत नाहीं. त्याला इतर माणसांशीं संबंध ठेवावेच लागतात. हे संबंध ठेवण्याच्या निमित्तानें नाना प्रकारच्या सामाजिक संस्था माणूस निर्माण करतो. या संस्था नेहमींच माणसाच्या स्वाभाविक सज्जनतेच्या आविष्काराला पोषक ठरतातच असें नाहीं. कित्येक वेळां त्या

गेल्या ३० जानेवारी, १९५६ ला गांधीजींच्या सातव्या निर्याणदिनीं पुणें नभोवाणीवर श्री. शंकरराव देव यांचें जें भाषण झालें तें पुणें नभोवाणी-अधिकाऱ्यांच्या अनुज्ञेनें येथें दिलें आहे — का. सं.



अनुक्रमणिका






माणसाच्या सज्जनतेला प्रतिबंध करतात; इतकेंच नव्हें तर त्यांना दुष्टतेच्या मार्गावर नेण्यालाहि कारणीभूत होतात. अशा वेळीं माणसाच्या सज्जनतेच्या रक्षणासाठीं बाह्य संस्थांशीं झगडून त्यांत क्रांतिकारक बदल घडवून आणावे लागतात. मानवसमाजाच्या इतिहासांत अशा प्रकारच्या अनेक क्रांत्या झालेल्या दिसून येतील. पण या क्रांतीच्या साधनांत कित्येक वेळां अज्ञानानें अथवा नाइलाजानें सज्जनतेचा विनाश होईल अशा प्रवृत्तींचा स्वीकार केला जातो. त्यामुळें बाह्य क्रांति होऊनहि सज्जनतेचा व्हावा तितका जय होत नाहीं. कित्येक वेळां तिचा पराभवहि झालेला दिसून येतो. सामाजिक क्रान्त्यांचें हें वैफल्य दूर करावयाचें असेल तर क्रांतीच्या साधनांत सज्जनताविरोधी प्रवृत्तींचा समावेश करण्याचा मोह क्रांतिकारकांनीं कटाक्षानें टाळला पाहिजे. तरच क्रांति मानवतेच्या दृष्टीनें यशस्वी होईल व मानव-जीवन सज्जनतेच्या विकासाला अनुकूल होईल. गांधीजींच्या सत्याग्रह-मार्गाचें हें वैशिष्ट्य सर्व सामाजिक सुधारकांनीं आणि क्रांतिकारकांनीं समजून घेतलें पाहिजे.

## द्वैताचा सहिष्णुतेनें स्वीकार

हिंदुस्थानसारख्या संमिश्र समाजांत निरनिराळे मतभेदांचे प्रश्न सोडविण्यासाठीं सत्याग्रहाचाच मार्ग स्वीकारला पाहिजे. आधींच येथें नानाप्रकारचे भेद आहेत. धर्मभेद आहेत, भाषाभेद आहेत, जातिभेद आहेत. कोणताहि मतभेदात्मक प्रश्न सोडवितांना येथील लोकांच्या मनांत जर प्रक्षोभ उत्पन्न झाला तर मतभेद दूर होण्याऐवजीं त्यांत मनाची कटुता आणि द्वेष या विकृती शिरण्याचा धोका आहे. द्वैतांत अद्वैत पाहण्याचा तत्त्वज्ञानाचा मार्ग सामाजिक व्यवहारांत आणावयाचा म्हणजे द्वैताचा प्रेमानें व सहिष्णुतेनें स्वीकार करावयाचा असा अर्थ होतो. द्वैत म्हणजे विविधता. अशा अर्थानें भारतीय समाज नेहमींच द्वैतमय राहील. आपण अभिनिवेशाच्या आहारीं जाऊन भारतीय समाजाला एकरूप बनविण्याचा अट्टहास करतां कामा नये. विविधतेमध्यें स्वभावतःच विरोध येतो असें मानण्याचें कारण नाहीं. विविधता स्वीकारूनहि परस्परांशीं समंजसपणानें, न्यायानें आणि सहिष्णुतेनें वागणें शक्य आहे. जेथें अन्याय होईल तेथें विचार-विनिमयाच्या मार्गानें, हृदयपरिवर्तनाच्या प्रक्रियेनें तो दूर करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. सज्जनतेचा परिपोष करूनच आमचे सामाजिक प्रश्न लौकर सोडवितां येतील.

गांधीजींचा सत्याग्रहाचा प्रयोग प्रामुख्यानें राजकीय क्षेत्रांत झाला. पारतंत्र्याच्या विरुद्ध करावयाच्या झगड्यासाठीं सत्याग्रहाचे कार्यक्रम म्हणून ज्या गोष्टी पुढें आल्या त्यांत सामुदायिक प्रक्षोभ वेळोवेळीं प्रगट होत गेला. त्यामुळें सत्याग्रह म्हणजे प्रक्षोभात्मक आंदोलनें अशी आपल्यांतील पुष्कळ लोकांची समजूत झाली आहे. पण सत्याग्रहाचें खरें मर्म प्रक्षोभ हें नाहीं. उलट, होत असलेला प्रक्षोभ शमविण्याचा प्रयत्न करणें हेंच सत्याग्रहाचें मुख्य कार्य आहे. सत्याग्रहांत कोणालाच शत्रु मानतां येणार नाहीं. म्हणून शत्रूचा निःपात करणें, त्याची कायमची खोडकी जिरविणें इत्यादि भावनांना सत्याग्रहांत स्थान नाहीं. जशास तसें हा सत्याग्रहाचा मार्ग नव्हे. आपल्या सौजन्याची अभिवृद्धि करून जेथें दुर्जनता आहे असें वाटतें तेथेंहि सुप्त असलेली सज्जनता जागृत करणें हेंच सत्याग्रहाचें तंत्र आहे. अन्याय करणारा माणूस अन्याय करीत राहातो याचें कारण त्याला आपण अन्याय करीत आहोंत याची बहुधा जाणीव नसते. अन्याय दूर करण्यासाठीं प्रयत्न करणाऱ्या सत्याग्रही पुरुषाला अन्यायी माणसांतहि जाणीव निर्माण करावयाची असते. असें करतांना स्वतः कोणताहि अन्याय करतां कामा नये. असत्याशीं असत्य, कपटाशीं कपट आचरिल्यानें क्वचित् प्रसंगीं व्यावहारिक जय झालेला दिसला, तरी अन्यायाचें मूळ दूर होण्यास त्यामुळें कसलीच मदत होत नाहीं. असत्याचा सत्यानें, द्वेषाचा प्रेमानें आणि अन्यायाचा न्यायानें विरोध केल्यानेंच असत्य व अन्याय यांचें निर्मूलन होतें. विरोधी व्यक्तीच्या व गटाच्या हृदयांतील सद्भावना जागृत होईपर्यंत सत्याग्रही माणसाला आपला विरोध चालू ठेवावा लागतो. यासाठीं सत्याग्रहाच्या मार्गांत सबूरीची विशेष महती मानली जाते. उतावीळपणा हें सज्जनतेला मारणारें विष आहे. मतभेदाच्या प्रसंगीं आपल्या चित्तवृत्तींत उतावीळपणाचा विकार शिरणार नाहीं याची दक्षता घ्यावी लागते.

## आत्मौपम्याचा सिद्धान्त

सत्याग्रहाचा मार्ग हा मनुष्यांतील मूलभूत सज्जनते-










ल्या विकासाचा मार्ग असल्यामुळें तो संपूर्ण नैतिक मार्ग आहे. दुसऱ्यानें जसें आपणाशीं वागावें अशी आपली अपेक्षा असते तसें आपण स्वतः त्यांच्याशीं वागणें हा नीतिमार्ग होय. 'जसें आपणांला तसेंच इतरांना' हा आत्मौपम्याचा सिद्धान्तहि हाच मार्ग सुचवितो. म्हणून नीतिमार्गांत आपलें वर्तन सापेक्ष असूं शकत नाहीं. दुसरा चांगला वागत नाहीं म्हणून मी त्याच्याशीं चांगला वागणार नाहीं, हा नीतिमार्ग नव्हे. ती व्यावहारिक अडवणूक म्हणतां येईल. पण अशी अडवणूक करण्यासाठीं आपण सतत वांकड्या मार्गानें जाण्याचें ठरविलें तर शेवटीं आपलाहि व्यावहारिक नाश झाल्याशिवाय राहात नाहीं. कारण जीवनाचा सर्व व्यवहार शेवटीं प्रामाणिकपणावरच आधारलेला आहे. सत्य हें सर्व व्यवहाराचें आधारभूत तत्त्व आहे. त्या सत्याचा लोप झाला म्हणजे व्यवहारहि बिघडतो. म्हणून नीतिमार्गांत नीतीचें आचारण निरपेक्षपणेंच करावयाचें असतें. आपली सज्जनता कधींहि न सोडतां विरोधकाला आपलें म्हणणें न्यायाचें आहे हें पटवून देणें हाच खरा व्यवहार-मार्ग ठरतो. तात्पुरत्या व्यावहारिक लाभासाठीं सज्जनतेचा त्याग केला असतां आधीं सज्जनता जाते आणि मग व्यवहारहि बिघडतो. म्हणून सज्जनतेची सदैव जपणूक करणें हाच यशाचा राजमार्ग ठरतो.

सत्याग्रहाचें स्वरूप समजून घेतांना या तात्त्विक विचाराबरोबरच गांधीजींचें सारें जीवन तपासून पाहिलें तर आपणांला आणखी कित्येक गोष्टी स्पष्ट दिसूं लागतात. एखादा लढा उत्पन्न झाला म्हणजे सत्याग्रहपद्धतीनें कसें वागावें या प्रश्नाचें उत्तर केवळ तार्किक बुद्धीनें मिळण्यासारखें नाहीं. सत्याग्रह ही एक जीवनपद्धति आहे. ज्यानें आपल्या जीवनांत सत्याची व सौजन्याची सदैव जोपासना चालविली असेल त्यालाच एखाद्या विवक्षित प्रसंगीं सत्याग्रहानें कसें तोंड द्यावें हें सुचूं शकतें. गांधीजींच्या जीवन-विकासाबरोबरच त्यांच्या सत्याग्रह-मार्गाचाहि विकास होत गेला असें आपणांला आढळून येतें. सत्याग्रह हा एक जीवन-विचार आहे. आणि जीवनाच्या विकासाबरोबरच त्या विचाराचाहि विकास होणें हा त्याचा स्वभावच आहे. गांधीजी तरुण वयांत दक्षिण आफ्रिकेंत गेले. तेव्हां त्यांच्या पुढें कोणताहि सामाजिक प्रश्न नव्हता. केवळ चरितार्थाच्या साधनासाठींच ते गेले होते. पण तेथें गेल्यावर हळूहळू त्यांना तेथील सामाजिक जीवनाच्या प्रश्नांनीं घेरून टाकलें. व्यक्तिगत अपमान गिळून टाकून केवळ सुखाचा संसार चालविण्याचीच त्यांनीं इच्छा धरली असती तर त्यांचें जीवन अगदींच वेगळें झालें असतें, पण गांधीजींनीं आपल्या जीवनांत सुखापेक्षां कर्तव्याला श्रेष्ठ स्थान दिलें आणि त्यामुळेंच त्यांना सत्याग्रह-मार्गाचा शोध लागला. सामाजिक जीवनाशीं एकरूप होण्याची त्यांची वृत्ति त्यांच्या कर्तव्यभावनेंतूनच जन्म पावलेली दिसते. जर ते व्यक्तिगत जीवनांत गुरफटून राहिले असते तरी देखील त्यांना सत्याग्रह-मार्गाची साधना सुचली नसती. व्यक्तिगत सुखाच्या प्रेरणेंतून नैतिक प्रश्नाची निर्मिति होत नाहीं. व्यक्ति जेव्हां कर्तव्याच्या जाणिवेनें स्वतःच्या बाहेर पाहूं लागते तेव्हांच नैतिक जीवनाची निर्मिति होते. आपलें जीवन कर्तव्यभावनेवर उभारलें गेलें पाहिजे ही गांधींची स्वाभाविक प्रेरणा होती. त्यांच्या बालपणीं त्यांच्यावर झालेले संस्कार या कर्तव्यभावनेला पोषकच होते. मात्र, गांधीजींच्या जीवनांत कर्तव्यभावनेनें फार मोठें सामाजिक स्वरूप धारण केलें आणि म्हणूनच त्यांचें जीवन ही एक सामाजिक जीवनाचे प्रश्न सोडविणारी प्रयोगशाळा बनली.

## नैतिक जीवनाचा मूलमंत्र

गांधीजींचा बहुतेक जीवनकाल राजकीय क्षेत्रांतील अन्याय निवारण्याच्या कामीं खर्ची पडला असला तरी त्यांची जीवनाकडे पाहण्याची दृष्टि केवळ राजकीय नव्हती. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत सत्य प्रस्थापित व्हावें अशी त्यांची तळमळ असे. सामाजिक जीवनांतील सर्व अन्याय दूर व्हावे, आर्थिक क्षेत्रांतील सर्व पिळवणूक दूर व्हावी आणि माणसा-माणसांचे परस्पर व्यवहार सज्जनतेच्या आधारावर चालू व्हावेत असें त्यांचें जीवनाचें भव्य स्वप्न होतें. मानवांतील सर्व कृत्रिम भेदांच्या भिंती फोडून त्यांची दृष्टि विश्वांतील महामानवावर स्थिर झाली होती. धर्म, राष्ट्र इत्यादि भेदांनीं त्यांच्या बुद्धीला संकुचित केलें नव्हतें. कसल्याहि प्रकारचा आपपर भाव त्यांच्या मनांत उरला नव्हता. म्हणून त्यांना जगांतील सर्व राष्ट्रांनीं आपलें मानलें आणि त्यांच्या प्रयोगांत लक्ष घातलें. आजपर्यंत चालत आलेल्या विश्वकुटुंबवादी विभूतिपरंपरेंत










गांधीजींचें स्थान मान्य करण्यांत आलें आहे. आज सारें जग आधुनिक शोधांनीं जवळ आलें आहे. विज्ञानाच्या साधनांनीं माणसाचें दारिद्र्य दूर होण्याची शक्यताहि निर्माण झाली आहे, पण भौतिक विपुलतेच्या या काळांत जगभर मानवांत नैतिक जीवनाचें दारिद्र्य दूर करण्यासाठीं नैतिक जीवनाचाच आधार घ्यावा लागेल. धर्म, ईश्वर, अध्यात्म इत्यादि अनेक विचार मानवाला नैतिक जीवनाची दीक्षा देण्याचे प्रयत्न करीत असतात. परंतु कोणाहि साध्याभोळ्या माणसाला कसल्याहि गूढ अथवा जटिल समस्येंत न जातां नैतिक जीवनाचा अर्थ समजून घ्यावयाचा असेल तर त्यानें आपल्या हृदयांतील सज्जनतेचा विकास करावा म्हणजे झालें. सज्जनतेवरील श्रद्धा हाच नैतिक जीवनाचा मूलमंत्र आहे. प्रत्येक मनुष्यमात्रांत सज्जनता भरून राहिलेली आहे आणि आपण दुसऱ्याशीं सज्जनतेनें वागलें असतां त्याची प्रतिक्रिया सज्जनतेचीच झाली पाहिजे एवढी श्रद्धा पुरेशी आहे. बौद्धिकदृष्ट्या तत्त्वज्ञानाचा कीस काढण्याची नैतिक जीवनाला गरज नाहीं. चांगल्याचें फल चांगलेंच आणि वाईटाचें फल वाईट असाच सृष्टीचा व्यवहार आहे. म्हणून जें चांगलें वाटेल त्याला घट्ट धरून राहाणें एवढाच धर्ममार्ग आहे.

पण या चांगल्याचा अथवा सज्जनतेचा प्रत्यक्ष अनुभव पाहिजे. ज्या माणसाला आपल्या हृदयांत सज्जनतेचा अनुभव येतो तो ‘ अंतरीं निर्मळ आणि वाचेचा रसाळ ’ सहजच बनतो. आज भारतांत आणि विशेषतः महाराष्ट्रांत आपणाला या साधनेची तीव्र गरज आहे. आपल्या सामाजिक जीवनांत अनेक प्रकारचे अभाव आणि अनेक प्रकारचे दोष दिसत आहेत. हे अभाव आणि हे दोष घालविण्यासाठीं आपण जाणीवपूर्वक प्रयत्न केले पाहिजेत. व्यक्ति-जीवनांतच गुरफटल्यामुळें आपल्यांतील सामुदायिक विकासाचे प्रयत्न खुरटत आहेत. महाराष्ट्रांत बुद्धि आहे, त्याग आहे, चिवटपणा आहे; पण हे सारे सद्गुण सामाजिक विकासासाठीं निरपेक्षपणें अर्पिण्याची निष्ठा वाढविली पाहिजे. गांधीजींच्या चरित्राच्या अवलोकनानें आपणाला अशी निष्ठा संपादितां येईल. गांधीजींचा मार्ग नवा नाहीं. साधुसंतांच्या परंपरेला तो विरुद्ध नाहीं. फक्त आजच्या काळाच्या गरजेसाठीं तो व्यापक झालेला आहे. व्यक्तीप्रमाणेंच समाजाला व राष्ट्रालाहि चारित्र्याची गरज असते. आणि चारित्र्याचा आधार सज्जनता हाच असतो. ही सज्जनता प्रत्येक व्यक्तीच्या अंगीं बाणल्यानेंच आपल्या समाजाचा व राष्ट्राचाहि सर्व बाजूंनीं उद्धार होणार आहे.

गांधीजींच्या पुण्यतिथीच्या दिवशीं आपण सर्वांनीं आपलें जीवन सज्जनतेनें परिपूर्ण व्हावें अशी इच्छा धरावी व त्यासाठीं प्रयत्नपूर्वक झटावें. थोर पुरुषांच्या जीवनाचें स्मरण यासाठींच करावयाचें असतें.

---

## मळयांतुन खळयामध्यें !

गवताची लाण झाली
कवळाचें भारे आले
धुमसली भाजावळ
जरा ऊर झेंपावलें

आगोटचे मस्तलेले
कोसळले ढग खालीं
जोतें जोतें जुंपूनिया
पेरणी सर्वत्र झाली

आठ दिशीं फोफावली
जित्रापाची मायावती
लोंबरांचीं कणसांचीं
जिणीं अतां हांसवती

मळयांतुन खळयामध्यें
श्रमांचें हें दिव्य आलें
जरा कुठें डोळयामध्यें
श्रांत अतां शांत झालें !

— दत्ता कदम

डॉ. चार्ल्स कादू

# फ्रान्समधील राजकारण : कांहीं विचार

राजकारणाविषयीं बोलणें वा लिहिणें हें नेहमींच कठिण असतें. कारण, राजकीय जीवनच मुळीं गुंतागुंतीचें आहे. त्यांत पुन्हां दहा वर्षें इतक्या कालावधीच्या राजकारणाचा आढावा घेणें हें जास्तीच कठिण. कारण त्यांत अनेक गोष्टींची भेसळ झालेली असते. त्यांतहि पुन्हां फ्रान्ससारख्या देशाच्या अस्थिर राजकारणाविषयीं लिहिणें हें तर काम महाकठिणच. म्हणून प्रस्तुत लेखांत फ्रेंच राजकारणांतील घडामोडींचा सविस्तर आढावा न घेतां त्यांतील कांहीं प्रमुख प्रवृत्तींसंबंधीं कांहीं स्फुट विचार प्रकट करावयाचें योजिलें आहे.

त्यांतहि पुन्हां फ्रेंच राजकारणांतील अंतर्गत प्रवृत्तींचेंच प्रामुख्यानें विवेचन करावयाचा उद्देश आहे. फ्रान्सच्या राजकारणांतील अंतर्गत धोरणाच्या मानानें फ्रान्सच्या राजकारणांतील परराष्ट्रीय धोरण पुष्कळच स्थिर आहे असें म्हणतां येईल. १९४५ ते १९५४ या अवधींत फ्रान्सचे परराष्ट्रीय मंत्री श्री. बिडोल्ट आणि श्री. शुमन हे दोघेच होऊन गेले आणि तेहि एकाच रिपब्लिक पॉप्युलर पक्षाचेच होते. परंतु अंतर्गत राजकारण खूपच बदलतें, अस्थिर होतें. अस्थिरता हाच त्याचा स्थायी भाव आहे, असें म्हटलें तरी चालेल.

१९४५ सालीं नात्सींचा पराभव होऊन दोस्तांचा विजय झाल्यावर, फ्रान्समध्यें सार्वत्रिक विजयानंदाचें वातावरण दुमदुमूं लागलें. त्यांत, अगदीं सामान्य माणसापासून तों राजकारणी नेत्यांपर्यंत सर्वांच्या मनांत साहजिकच नवीन चैतन्य खेळूं लागलें. नात्सींच्या विरुद्ध केलेल्या 'रेझिस्टन्स' चळवळींत फ्रान्समधील सर्व प्रकारचे लोक सामील झाले होते व त्यांच्याशीं खांदा देऊन लढले होते. विजयानंतर फ्रान्समध्यें राजकीय जीवनाची नवी घडी कशी बसवावयाची हाच विचार लोकांपुढें प्रामुख्यानें होता. आणि या बाबतींत सर्व विचारवंतांची व कार्यकर्त्यांची एकवाक्यता होती. हाच विचार प्रामुख्यानें यायला कारणेंहि तशींच होतीं. १९४०–४४ या कालांत फ्रान्समध्यें सर्वाधिकारशाही व संधिसाधु राजकारणाचे जे नाना प्रकार घडून आले त्यांविषयींची लोकांची स्मृति ताजी तशीच अत्यंत कटु अशी होती. फ्रान्सच्या मागल्या म्हणजे तिसऱ्या रिपब्लिकच्या धोरणानें जो अनर्थ ओढवला तो सर्वांना भोंवला होता. म्हणून जुन्या धोरणाला कायमची तिलांजलि देऊन, ज्यांत लोकांना खराखुरा अधिकार प्राप्त होईल, राज्यकारभार करणारें सरकार स्थिर राहील व फ्रान्समध्यें खरीखुरी राजकीय, सामाजिक व आर्थिक लोकशाही स्थापन होईल अशी एक नवीन राजकीय घडी बसवावी हेंच ध्येय सर्वांपुढें प्रामुख्यानें होतें.

याच ध्येयानें प्रेरित होऊन ४ थ्या फ्रेंच रिपब्लिकची घटना आंखली जाऊन, तिच्यावर फ्रेंच जनतेचें मत घेतलें गेलें व तिची २७ ऑक्टोबर १९४६ रोजीं जाहीर घोषणा झाली.

१९४६ सालीं झालेल्या फ्रान्सच्या ४ थ्या रिपब्लिकच्या घटनेचा प्रमुख उद्देश फ्रान्समध्यें लोकशाहीवर आधारलेलें मजबूत व स्थिर सरकार प्रस्थापित करणें हा होता. त्याच उद्देशानें पूर्वीच्या राजकीय घटनेंत बदल केला गेला. पूर्वीं तिसऱ्या रिपब्लिकच्या घटनेप्रमाणें फ्रेंच पार्लमेंटच्या दोन्हीं सभागृहांना – ॲसेंब्ली व सेनेट यांना समान अधिकार होता. पण नवीन ४ थ्या रिपब्लिकच्या घटनेनुसार एकच म्हणजे नॅशनल असेंब्ली 'Chambre des Deputes' हीच सर्वशक्तिमान् बनविण्यांत आली. तिलाच कायदे करायचे सर्व अधिकार देण्यांत आले. दुसरें सभागृह जें रिपब्लिक कौन्सिल किंवा फ्रेंच सीनेट त्याला केवळ सल्लामसलत देण्याचें काम राहिलें. मंत्रिमंडळांत उलथापालथ करायचें सीनेटला सामर्थ्य नाहीं. चौथ्या रिपब्लिकच्या घटनेप्रमाणें स्थापन झालेल्या फ्रेंच संघराज्याची घटना व उद्दिष्ट पुढीलप्रमाणें आहे : "फ्रेंच संघराज्य

डॉ. चार्ल्स कादू हे फ्रान्समधून भारतांत अभ्यास करण्याकरितां आले आहेत. ते हल्लीं पुणें विद्यापीठांत फ्रेंच शिकवीत असून, कायदा व घटना यांचा अभ्यास करीत आहेत. युद्धसमाप्तीनंतरच्या गेल्या दहा वर्षांतील फ्रेंच राजकारणावर डॉ. चार्ल्स कादू ( Cadoux ) यांनीं 'इंडिअन कौन्सिल ऑफ् वर्ल्ड अॅफेअर्स' च्या पुणें शाखेपुढें एक भाषण नुकतेंच केलें त्या भाषणाच्या टिपणांच्या आधारें प्रस्तुत लेख तयार केला आहे. – का. सं.

हें अनेक राष्ट्रांचें व लोकांचें संघराज्य आहे. या सर्वांनीं आपल्या जवळची साधनसंपत्ति एकत्रित करून तिचा विनियोग आपली संस्कृति व आपलें कल्याण यांचें संवर्धन करण्याकरितां व आपली सुरक्षितता राखण्याकरितां करावयाचा आहे. सर्वांनीं स्वतःचा कारभार पहावा, सर्वांना स्वयंशासनाचें स्वातंत्र्य असावें याच हेतूनें फ्रान्स लोकांना मार्गदर्शन करीत राहील. "

वरील उद्दिष्ट साध्य करण्याच्या दृष्टीनें, फ्रान्सच्या कक्षेंतील सर्व मुलुखांचें पुन्हां वर्गीकरण करून त्या त्या मुलखांतील लोकांना प्रतिनिधित्वाचे अधिकार देणें प्राप्त होतें. पूर्वीच्या वसाहतींना आतां समान दर्जा देणें अवश्य झालें. वसाहतवाद संपुष्टांत आला. ' वसाहती ' अशा राहिल्या नाहींत. फ्रेंच साम्राज्य जाऊन त्याऐवजीं सारख्या दर्जाचे घटक एकत्र आणून अशा समान रज्जूनें बांधलेल्या घटकांचें फ्रेंच संघराज्य अस्तित्वांत आलें. त्यामुळें जुन्या ' वसाहती ' म्हणून गणल्या गेलेल्या मुलुखाचें नवीन वर्गीकरण करणें अवश्य झालें. फ्रान्सच्या कक्षेंत जे निरनिराळे मुलुख होते त्यांची संस्कृति व प्रगति समान नव्हती. त्यांची राज्यकारभाराची अंतर्गत रचना निरनिराळी होती. त्यांचे आर्थिक हितसंबंधहि निराळे होते. त्यांची ऐतिहासिक व भौगोलिक पार्श्वभूमीहि निराळी होती. त्यामुळें घटनेंत त्यांचे निरनिराळे वर्ग पाडले गेले ते असे : ( १ ) समुद्रापलीकडील प्रदेश ( Overseas Territories. ). यांत पश्चिम व मध्य आफ्रिका, मादागास्कर आणि ओशिआनिक टेरिटरी यांचा अंतर्भाव होतो. उत्तर आफ्रिका यांत समाविष्ट नाहीं. ( २ ) संबद्ध प्रदेश (Associate Territories)– पूर्वी जर्मनांच्या ताब्यांत असलेले कॅमेरॉन-टोगो व संबद्ध राज्यें ( Associate States ): पूर्वीचें इंडोचायना. ( ३ ) ओव्हरसीज खातीं : अंटिल्लास– रियुनिअन– हीं संपूर्णपणें फ्रान्सचा भाग गणलीं गेलीं. कारण तेथील लोक पूर्वी फ्रान्समधून निर्गत झालेले फ्रेंचच होत. ( ४ ) अल्जीरिआ– त्याचे तीन विभाग पाडण्यांत आले व तो फ्रान्सचाच एक भाग गणला गेला. यामागें उद्देश हा कीं अल्जीरिअन लोकांना फ्रेंच नागरिकत्वाचे अधिकार देऊन त्यांना फ्रान्सचाच एक घटक करून घ्यायचें. (५) ट्युनिशिआ व मोरोक्को : यांना फक्त ' संरक्षित राज्यें ' म्हणण्यांत आलें. फ्रेंच संघराज्यांत त्यांचा समावेश करण्यांत आला नाहीं. – अर्थात् वरील वर्गीकरण हें गुंतागुंतीचेंच आहे. तें करतांना त्याच्यामागें ऐतिहासिक, आर्थिक, राजकीय असे अनेक विचार होते.

समुद्रापलीकडील या प्रदेशांतील लोकांना एक ' प्रादेशिक लोकसभा ' निवडण्याचा हक्क देण्यांत आला. त्या प्रादेशिक लोकसभेंत, त्या त्या प्रदेशांतील लोकप्रतिनिधींबरोबर फ्रेंच प्रतिनिधींना जागा देण्यांत आल्या. शिवाय समुद्रापलीकडील या प्रदेशांची फ्रान्समध्यें व्हर्सेलाय या शहरीं एक सेंट्रल असेंब्ली व 'हाय् कौन्सिल फॉर फ्रेंच युनिअन ' हीं स्थापन करण्यांत आलीं. त्याचा अध्यक्ष फ्रेंच रिपब्लिकचाच अध्यक्ष आहे. या नव्या मंडळांमुळें फ्रान्स व फ्रान्सबाहेरचे मुलुख यांची प्रगति परस्परांच्या मदतीनें व परस्परावलंबित्वानें साधली जावी, हा हेतु होता.

सारांश, १९४६ च्या चौथ्या फ्रेंच रिपब्लिकच्या राज्यघटनेचा उद्देश द्विविध होता : एक म्हणजे कांहीं थोडेच राजकीय पक्ष बनावेत, त्या पक्षांच्या द्वारें लोकांची सत्ता प्रकट व्हावी. त्यांतून निवडलें गेलेलें राज्यकारभार करणारें मंत्रिमंडळ स्थिर रहावें; तें फक्त नॅशनल ॲसेंब्लीलाच जबाबदार रहावें. व दुसरा हेतु म्हणजे समुद्रापलीकडील प्रदेशांतील लोकांना प्रतिनिधित्व देऊन त्यांचे जे व जसजसे प्रश्न उत्पन्न होतील ते सोडविण्याकरितां प्रतिनिधींच्या इच्छा व सल्ला यांचा उपयोग व्हावा.

४ थ्या रिपब्लिकची घटना होऊन आतां १० वर्षें लोटतील. परंतु पूर्वीच्या तिसऱ्या रिपब्लिकच्या वेळच्या परिस्थितींत कोणताहि फरक पडलेला नाहीं. राजकीय पक्षांच्या अनेक चिरफळ्या झाल्या असून त्यांमध्यें संघर्ष सारखे चालूच आहेत. त्यामुळें फ्रेंच मंत्रिमंडळांची अस्थिरता अजून आहे तशीच कायम आहे. गेल्या २ जानेवारी १९५६ ला फ्रान्समध्यें ज्या सार्वत्रिक निवडणुका झाल्या त्यांतून १८ पक्ष पुढें आले आहेत. अर्थात् या पक्षांतील बारीकसारीक भेद बगळून स्थूल मानानें बघितल्यास तीन-चार गट पडतात. फोर नेते असलेल्या ' राइट-सेंटर ' गटाला










१८३ मत, मँदेस फ्रान्स नेते असलेल्या 'लेफ्ट-सेंटर' गटाला १६१, कम्युनिस्टांना १४५ अशीं मतें मिळालीं आहेत. या निवडणुकींतील आणखी एक विलक्षण गोष्ट म्हणजे एका वर्षापूर्वीच स्थापन झालेला पूजाद, ( Poujadist ) पक्ष - या फॅसिस्ट गटाला ५२ जागा मिळाल्या आहेत. त्यामुळें कोणत्याहि गटाला स्वसामर्थ्यानें मंत्रिमंडळ बनवितां येणार नाहीं. असें म्हणतात कीं, गेल्या शंभर वर्षांच्या काळांत ६५ फ्रेंच मंत्रिमंडळें होऊन गेलीं; त्या अवधींत एका मंत्रिमंडळाचें आयुर्मान सरासरीनें ७ महिने २४ दिवस पडतें. या उलट, १९४६ पासून जीं मंत्रिमंडळें होऊन गेलीं त्यांचें सरासरी आयुर्मान सुमारें जेमतेम ७ महिनेच पडतें !

अनेक पक्षांचा बुजबुजाट असलेल्या नॅशनल ॲसेंब्लीला जबाबदार असलेल्या मंत्रिमंडळांतील मुख्य नेत्याला आपल्या मंत्रिमंडळाच्या धोरणाला बहुमत मिळवायचें झालें तर अनेक पक्षांशीं सवदेबाजी करावी लागते. सगळयांनाच खूष करावें लागत असल्यामुळें महामंत्र्याला दृढनिश्चयी व करारी राहून धडाडीनें कांहीं योजना आंखून ती पार पाडणें अशक्यच होतें. म्हणून कांहीं अपवादात्मक परिस्थिति सोडल्यास, साधारणपणें कांहीं काळ टिकून निभावून नेणारा मंत्रिमंडळाचा मुख्य नेता हा उजव्या-डाव्यांना सर्वांनाच 'होय' म्हणून नाखूष न करणारा, अभिवचनें देऊन, सवदे करून डावपेंच लढविणारा असा हिकमती स्वभावाचाच गृहस्थ निवडला जातो. फ्रेंच नॅशनल ॲसेंब्लीला जणूं करारी, दृढनिश्चयी, बाणेदार मुख्य मंत्र्याचें वावडेंच आहे ! याचा परिणाम असा झाला आहे कीं, राजकीय दृष्ट्या प्रगतिशून्य (Pioneers of Immobilism) अशीं मॅन्स कीव्हिल किंवा लॅनिएट यांसारखीं माणसें नेतृत्वपदीं येतात व राजकारणाचा गाडा आहे तेथेंच रुतून रहातो. मंत्रिमंडळाच्या अस्थिरतेमुळें राजकारण कर्तव्यशून्य बनतें. सरकारची धडाडीनें कार्य करण्याची शक्तिच कुंठित होते. अशा अस्थिर राजकीय परिस्थितींत फ्रान्सच्या मुख्य मंत्र्याची स्थिति मोठी अनुकंपनीय होते, यांत शंका नाहीं. त्याचे सहकारी ज्या निरनिराळया पक्षांचे प्रतिनिधि म्हणून आलेले असतात ते आपापल्या पक्षनेत्यांचे आदेश मानीत असतात ! मुख्य मंत्र्यांना जबाबदार राहून शिस्तीचें पालन करण्याची त्यांना आवश्यकता वाटत नाहीं. त्यामुळें मंत्रिमंडळ एकजीव वा एकसंध न रहातां अनेक पक्षप्रतिनिधींची एक मोट किंवा कडबोळें बनून रहातें. मुख्य मंत्र्याला बिचाऱ्याला एका बाजूला नॅशनल ॲसेंब्लीला तोंड द्यावें लागतें तर दुसऱ्या बाजूला आपल्या मंत्रिमंडळाची मोट कशीबशी टिकवून ठेवावी लागते !

पक्षांच्या या बुजबुजाटाचा व मंत्रिमंडळें सारखीं वारंवार गडगडण्याचा परिणाम असा झाला आहे कीं, फ्रान्सचा सर्वसाधारण मतदार हा उदासीन बनला आहे. मंत्रिमंडळाच्या वारंवार होणाऱ्या बदलांमुळें फ्रेंच भाषेंत अशा अर्थाची एक म्हणच पडून गेली आहे कीं, " जितका जितका बदल कराल तितकें तितकें येरे माझ्या मागल्या ! ". या उदासीनतेचें प्रत्यंतर सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळीं दिसून येतें. कित्येक ठिकाणीं अल्प मतदान होतें. फ्रान्समध्यें सर्वांना मतदानाचा हक्क फार जुन्या काळापासून मिळालेला आहे. त्यामुळेंच जणूं मतदानाच्या हक्काचें कांहीं कोणाला वाटेनासें झालें आहे ! फ्रेंच राजकीय जीवनांत कांहीं प्रश्न मात्र लोकांना अत्यंत महत्त्वाचे वाटतात व त्यांचा विचार चालू असतांना फ्रेंच मतदार खडबडून जागा होतो व कांहीं काळ त्याच्या ठिकाणीं चैतन्य संचरल्यासारखें दिसतें. उदाहरणार्थ, कम्युनिस्ट व कम्युनिस्टेतर हा भेद अत्यंत खोल व जिव्हाळयाचा असून या दोन विचारसरणी कोणी जोडदुव्यानें जोडूं म्हणेल तर तें शक्यच नाहीं. – दुसरा एक प्रश्न, जो फ्रेंच मतदारांना जिव्हाळयाचा वाटतो, तो म्हणजे फ्रान्समधील कॅथॉलिक स्कूलसचा. फ्रान्समध्यें कॅथॉलिक शाळा असंख्य आहेत. पण प्राथमिक शिक्षणाच्या बाबतींत सरकारचें धोरण धर्मनिरपेक्ष (secular) आहे. त्यामुळें या कॅथॉलिक शाळांना सरकारनें मदत करावी कीं नाहीं ह्या प्रश्नावर फ्रान्समध्यें खूप वादंग माजलें आहे. जर मदत केली तर सरकारच्या धर्मनिरपेक्ष धोरणाला बाध येतो; बरें, जर मदत केली नाहीं तर कॅथॉलिक शाळा जें शिक्षणकार्य करीत आहेत तें कार्य करणें सरकारच्या ऐपतीपलीकडील असल्यामुळें शिक्षणकार्याचीच हानि होईल ! अशा परिस्थितींत कॅथॉलिक स्कूलसमधील विद्यार्थ्यांचा पालकवर्गच मुळीं सरकारनें मदत दिली








पाहिजे या धोरणाचा पुरस्कार करतो. एम्. आर्. पी. सारख्या पक्षाचा इतर कार्यक्रम जरी मतदाराला मान्य नसला तरी तो पक्ष कॅथॉलिक शाळांना मदत द्यावयाच्या बाजूचा आहे, याच कारणास्तव कॅथॉलिक मतदार त्या पक्षाला मत द्यावयाला तयार असतो. तसेंच दारूबाबतच्या धोरणालाहि गेलीं ५ वर्षे फार महत्त्व प्राप्त झालें आहे. नवीन परिस्थितींत अल्जीरियांतील द्राक्षांचे मळेवाले दारूच्या विक्रीबाबत स्पर्धा करीत असून अडवूं पहात आहेत. व त्यामुळें दारूच्या उत्पादनावरच अरिष्ट कोसळूं पहात आहे.

फ्रेंच राजकारणांतील अस्थिरतेचें बीज फ्रेंच लोकांच्या मनोवृत्तींतहि आहे. फ्रेंच मनुष्य हा तर्कशुद्ध विचार करणारा तत्त्वप्रिय मनोवृत्तीचा 'कार्टेशिअन' समजला जात असला तरी त्याच्या स्वभावाची ठेवण व्यक्तिवादी आहे. आपल्यासमोरील प्रश्नांचा तर्कशुद्ध विचार जरी त्याला समजत असला, तरी व्यक्तिवादी मनोवृत्तीमुळें त्याला तो उमजत नाहीं. त्यावर मत देतांना तर्कशुद्ध विवेकापेक्षां आपले पूर्वविकार, भावना व संस्कार यांना अनुसरूनच तो मत देत असतो. जी गोष्ट व्यक्तीची तीच पक्षाची. केवळ एका गोष्टींत जरी मतभेद झाला तरी पक्षांत दुफळी होऊन, भिन्न पक्ष बनतात. फ्रेंच मतदाराच्या या चमत्कारिक भावनात्मक प्रतिक्रियेचें उदाहरण म्हणून पूजादिझम-( Poujadism )-च्या उदयाचें देतां येईल. सत्ताधारी पक्षाला कंटाळून त्यांत बदल करायच्या भरांत, पूजाद-( Poujade ) सारख्या सामान्य कागद-व्यापाऱ्याला व त्याच्या अनुयायांना निवडून दिला. या पूजादला राजकीय ध्येय वा कार्यक्रम कांहींच नव्हता. तो स्वतःला 'गरीबांचा नेपोलिअन' म्हणवतो. सरकारला कर देऊं नका एवढाच त्याचा प्रचार व कार्यक्रम होता.

फ्रेंच राजकारणांतील अस्थिरता ज्या पक्षबाहुल्यामुळें निर्माण झाली आहे, तें पक्षबाहुल्यहि नव्या निवडणुकपद्धतीचाच परिणाम आहे. नवीन चौथें फ्रेंच रिपब्लिक स्थापन करतांना, जुनी बहुमताची पद्धत जाऊन, तिच्याऐवजीं 'प्रमाणानुसारी प्रतिनिधिपद्धति' ( Proportional Representation ) आली. अर्थात्, ही नवीन निवडणूकपद्धति चालूं करण्यामागील हेतु हा होता कीं, फ्रेंच मतदारांमधील कोणत्याहि प्रमुख विचारांची मुस्कटदाबी न होतां, त्यांचें प्रतिबिंब नॅशनल ॲसेंब्लीमध्यें व शासनसत्तेमध्यें उमटून राज्यकारभार खराखुरा लोकशाही व्हावा. त्याप्रमाणें युद्धसमाप्तीनंतर पहिल्या सार्वत्रिक निवडणुकींत १९४७ सालीं १ रिपब्लिक पॉप्युलर मूव्हमेंट किंवा एम्. आर्. पी. (समाजवादी कॅथॉलिक) २ सोशॅलिस्ट ३ कम्युनिस्ट असे तीन मोठे पक्ष निवडून आले. मागें तिसऱ्या रिपब्लिकच्या अमदानींतील सत्ताधारी असलेल्या रॅडिकल पक्षाचा पार धुव्वा उडाला. पण पुढें निरनिराळ्या गुंतागुंतीच्या प्रश्नांवर देशांत नानाप्रकारचे भिन्न विचार व भिन्न पक्ष उत्पन्न झाले. दुसऱ्या १९५१ च्या सार्वत्रिक निवडणुकींत ४ वर्षांपूर्वी नेस्तनाबूत झालेला 'रॅडिकॅलिस्ट' हा पक्ष, त्याखेरीज मॉडरेट पक्ष, 'गॉलिस्ट' पक्ष हे निवडून आले. या पक्षांतहि पुन्हां मतभेद उत्पन्न होऊन त्यांच्या चिरफळ्या झाल्या. १९५५ पर्यंत 'गॉलिस्ट' पक्ष तर अस्तंगतच झाला. त्यांतून तीन पक्ष निघाले. मॉडरेट पक्षांत विचारानें थोडेफार परस्परांजवळ असलेले पण भिन्न असे तीन पक्ष झाले. रॅडिकल पक्षाचीहि एक डलादिएरच्या नेतृत्वाखालीं व दुसरें हेरिअट्च्या नेतृत्वाखालीं, अशीं दोन शकलें झालीं. युद्धसमाप्तीनंतर जें चौथें रिपब्लिक स्थापन झालें त्याच्या घटनेनुसार घोषित झालेल्या फ्रेंच युनिअनमध्यें, फ्रान्सबाहेरील समुद्रापलीकडील (overseas) फ्रान्सच्या मुलुखाचा अंतर्भाव करण्यांत आला. पूर्वीचा 'वसाहत' शब्द काढून टाकण्यांत आला, व या समुद्रापलीकडील मुलुखाची वाढ फ्रान्सच्या सहकार्यानें व्हावी, त्या मुलुखांतील लोकांना फ्रेंच नागरिकत्वाचे समान हक्क देण्यांत यावेत असेंहि घोषित करण्यांत आलें. तदनुसार आल्जीरियाच्या राज्यकारभाराची पुनर्रचना करण्यांत यावी अशा अर्थाचा एक कायदा २० सेप्टेंबर १९४७ रोजीं पासहि झाला. परंतु त्याची अंमलबजावणी मात्र होऊं शकली नाहीं. फरान्समध्यें सारख्या बदलणाऱ्या मंत्रिमंडळांना आपल्याच प्रश्नांना तोंड द्यावें लागलें व त्यांतच तीं गढून राहिलीं व उत्तर आफ्रिका, विशेषतः आल्जीरिया, येथील परिस्थिति अधिकाधिक बिघडतच गेली.

आशिया व आफ्रिकाखंडांतून राष्ट्रवादाचा उठाव जोरानें होत आहे व त्याचे पडसाद फरान्सच्या समुद्राबाहेरील मुलुखांतून उमटत असल्यास नवल नाहीं.








या मुलुखांतील लोकांचा वंश, संस्कृति, धर्म, आर्थिक परिस्थिति भिन्न भिन्न प्रकारची आहे. त्या सर्वांना समान दर्जा देऊन एकत्र निगडित करण्याचें कार्य ध्येयदृष्ट्या जरी योग्य व प्रशंसनीय असलें तरी प्रत्यक्ष अमलांत आणण्याच्या दृष्टीनें पहातां तें कठिण व कालावधीचें आहे. त्या मुलुखांतील लोकांना शिक्षण दिलें पाहिजे व आर्थिक जीवनमान वाढविलें पाहिजे. उत्तर आफ्रिकेंतील मुलुखाचा, विशेषतः आल्जीरिआचा प्रश्न हा मुख्यतः सामाजिक–आर्थिक आहे. आल्जीरिआ व फ्रान्स यांची अर्थव्यवस्था एकमेकांवर अवलंबून आहे. आर्थिक विकासाबरोबर तेथील लोकांच्या जागृत झालेल्या राजकीय आकांक्षाहि फ्रेंचांनीं लक्षांत घेतल्या पाहिजेत. फ्रेंच युनिअन स्थापन होऊन दहा वर्षें लवकरच होतील. फ्रान्समध्यें मूळ उद्‌भूत झालेल्या स्वातंत्र्य, समता व न्याय या कल्पनांचें लोण त्या मुलुखांपर्यंत जाऊन साहजिकच पोहोंचलें आहे. त्या कल्पना आतां तेथें प्रत्यक्ष अमलांत कशा आणतां येतील याचा फ्रेंचांनीं विचार करणें अगत्याचें झालें आहे.

## सोव्हिएट युनिअनचें परराष्ट्रीय धोरण

मार्शल स्टॅलिनच्या मृत्यूनंतर सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाची पहिली परिषद् नुकतीच मॉस्को येथें १४ फेब्रुवारी १९५६ ला भरली. त्यांत सोव्हिएट कम्युनिस्ट पक्षाचे चिटणीस निकिता क्रूश्चेव्ह यांचें मुख्य भाषण झालें. रशियाचें परराष्ट्रीय व अंतर्गत धोरण या दृष्टीनें, हें भाषण फार महत्त्वाचें आहे. त्या भाषणांतील कांहीं मुख्य मुद्दे पुढें दिले आहेत :

"आमच्या प्रयत्नांचें मुख्य उद्दिष्ट व वैशिष्ट्य हें आहे कीं समाजवाद ( Socialism ) एका देशाच्या चौकटींतून बाहेर पडावा व तो जगभर पसरून त्याचें जागतिक पद्धती-(world system)-मध्यें रूपांतर व्हावें. पण असा प्रयत्न करतांना आम्हांस एका देशांतून दुसऱ्या देशांत क्रान्तीची ( revolution ) निर्यात ( export ) करावयाची नाहीं. क्रान्तीची तशी निर्यात करूं पहाणें, क्रान्तीचा हुकूम काढून आयती हुकमी क्रान्ति घडवून आणतां येईल असें वाटणें हास्यास्पद होय. आम्ही जेव्हां असें प्रतिपादन करतों कीं, भांडवलशाही व समाजवाद यांच्या स्पर्धेत शेवटीं समाजवादाचीच सरशी होणार, तेव्हां त्याचा अर्थ असा नव्हे कीं, समाजवादी देशांनीं भांडवलशाही देशांच्या अंतर्गत कारभारांत शस्त्रास्त्रांच्या बळावर खुशाल हस्तक्षेप करावा ! समाजवाद किंवा साम्यवाद याचाच शेवटीं विजय होणार या आमच्या आत्मविश्वासाच्या बुडाशीं ही ढळढळीत वस्तुस्थिति आहे कीं भांडवलशाही उत्पादनपद्धतीपेक्षां समाजवादी उत्पादनपद्धतींतील फायदे निश्चित अधिक आहेत. हे फायदे लक्षांत घेऊन जगांतील सर्व कामकरी पुरुष व स्त्रिया समाजवादी समाजव्यवस्था निर्माण करण्याचाच प्रयत्न आज ना उद्यां करूं लागतील, असा आमचा विश्वास आहे.

"मार्क्सवादाचा एक गृहीत सिद्धांत असा आहे कीं, जोंपर्यंत साम्राज्यवाद जिवंत आहे, तोंपर्यंत युद्ध अटळ आहे. म्हणजे या सिद्धान्ताप्रमाणें जोंपर्यंत साम्राज्यवाद शिल्लक आहे, तोंपर्यंत युद्धजनक आर्थिक विषमता ही शिल्लक रहात असल्यामुळें, युद्ध हें अपरिहार्य होऊन बसतें. परंतु आज हा सिद्धान्त लागूं पडण्यासारखी परिस्थिति नाहीं. पूर्वी एक वेळ पहिल्या व दुसऱ्या महायुद्धांपूर्वीं हा सिद्धान्त खरा होता. त्यामुळेंच सोव्हिएट युनिअनला जागृत व सुसज्ज रहावें लागलें. पण आज युद्ध अटळ मानण्याचें कारण नाहीं. आज सामाजिक व राजकीय शक्ती इतक्या बलाढ्य झाल्या आहेत कीं जर कोणी साम्राज्यवादी राष्ट्रें युद्धाचीं भुतें जगावर सोडायचें मनांत आणील तर त्याला प्रतिरोध करण्याचें प्रभावी साधन आज त्यांच्याजवळ आहे.

"आमच्या परराष्ट्रीय धोरणाचीं पुढील पांच उद्दिष्टें आहेत : ( १ ) शांततामय सहजीवनाचें कांटेकोर पालन. ( २ ) 'पीपल्स डेमॉक्रसीं'शीं चांगले संबंध सर्वतोपरि बलवत्तर करणें. ( ३ ) भारत, ब्रह्मदेश व अफगाणिस्तान या देशांशीं मैत्रीचे संबंध दृढ करणें. आणि ज्या देशांना 'आक्रमक गटां'त जायची इच्छा नाहीं त्यांना पाठिंबा देणें. ( ४ ) अमेरिका, ब्रिटन व फ्रान्स या देशाबरोबर आर्थिक व सांस्कृतिक जीवनांतील विविध क्षेत्रांत संबंध सुधारणें. ( ५ ) शांततामय सहजीवनांत जे अडथळा आणीत असतील त्यांच्यावर सक्त नजर ठेवणें व त्याबरोबरच सोव्हिएट युनिअनचें संरक्षणसामर्थ्य वाढवून सोव्हिएट राज्याची सुरक्षितता अबाधित राहील अशी हमी घेणें.

"अंतर्गत कारभारांत, कमी पगारवाल्या कामकऱ्यांचे पगार वाढविणें, सात तास कामाचा दिवस करणें, घराची व्यवस्था सुधारणें या गोष्टी आम्हांस करावयाच्या आहेत."

( 'टाइम्स ऑफ इंडिया'वरून ता. १५।२।५६ )








डॉ. य. कृ. सोवनी

# राज्यपुनर्रचनेचा प्रश्न आणि संयुक्त महाराष्ट्राची कहाणी

[ राज्यपुनर्रचनासमितीच्या शिफारशींचा विचार करून भारतीय सरकारनें मुंबईबाबत आपला निर्णय देऊन टाकला आहे. भारतीय सरकारचा हा निर्णय भारतीय लोकसभेपुढें जाईल व तेथें त्याचा विचार होऊन, जें ठरेल त्यावर लोकसभेचें अखेरचें शिक्कामोर्तब होईल. म्हणून आतां 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र'च्या विषयींच्या प्रयत्नांचें अखेरचें पर्व सुरू झालें आहे, असें म्हणतां येईल. – रा. पु. समितीच्या शिफारशी प्रसिद्ध झाल्यापासून गेल्या चार महिन्यांत ज्या घटना घडून आल्या, जें लोकमानसाचें व व्यक्तिमानसाचें दर्शन झालें, तो विचारवंतांना एक मोठा विदारक, अपूर्व अनुभव म्हटला पाहिजे. गेल्या चार महिन्यांतील घटनांचा इतिहास ताजा असला तरी तो इतका भराभर घडून आलेला व त्यांतील अनेक प्रवृत्तींमुळें इतका गुंतागुंतीचा झाला आहे कीं सामान्य अभ्यासु वाचकांस त्याचें आकलन होण्याच्या दृष्टीनें या इतिहासाची क्रमवार सुसंगत अशी संक्षिप्त कथा एकत्र 'एका नजरेंत' पहायला मिळणें आवश्यक झालें आहे. – त्या दृष्टीनें प्रस्तुत प्रदीर्घ लेखांत डॉ. य. कृ. सोवनी यांनीं 'संयुक्त महाराष्ट्र' विषयक घटनांचें केलेलें सिंहावलोकन वाचकांस स्वागतार्ह वाटेल असा विश्वास वाटतो. — का. सं. ]

ता. १० आक्टोबर १९५५ रोजीं **राज्य-पुनर्रचना-समितीचा अहवाल** अधिकृतपणें प्रसिद्ध झाला. हा अहवाल प्रसिद्ध झाल्यानंतर गेल्या चार महिन्यांत महाराष्ट्रांत तत्संबंधीं ज्या घडामोडी झाल्या त्यांचा थोडक्यांत परामर्श घेण्याचा या लेखांत प्रयत्न केला आहे. समितीच्या प्रमुख शिफारसींचा येथें गोषवारा देण्याची गरज नाहीं. रा. पु. समितीनें भारतांतील राज्यांची जी पुनर्रचना सूचित केली त्यामुळें संयुक्त-महाराष्ट्रवाद्यांची किती घोर निराशा झाली, या अहवालासंबंधींच्या महाराष्ट्रांतील व एकंदर भारतांतील प्रतिक्रिया काय झाल्या त्याहि येथें देण्याची गरज नाहीं. कारण यासंबंधानें यापूर्वी अनेकांकडून अनेक ठिकाणीं लिहिलें गेलें आहे. समितीच्या शिफारसींचा अखेर परिणाम भारतांत एकूण १६ राज्यें निर्माण होण्यांत होणार असून त्यांतील मुंबई, पंजाब व आसाम या राज्यांखेरीज बाकीचीं सर्व राज्यें प्रामुख्यानें एकभाषिकांची वस्ती असणाऱ्या प्रदेशांची बनलेलीं आहेत. आसामची लोकवस्तीच अशी आहे कीं कितीहि प्रयत्न केला तरी तेथ एकभाषिक प्रदेशाचें राज्यच निर्माण होणें शक्य नाहीं व आसामी भाषिकांची तशी मागणीहि नव्हती. पंजाबचा प्रश्न हा फारसा भाषिक नसून जातीय आहे; कारण पंजाबी भाषा बोलणाऱ्या मोठ्या लोकसंख्येचा – पंजाबी हिंदूंचा – पंजाबीभाषी राज्यास विरोध आहे. म्हणजे प्रश्न राहतो फक्त मुंबई राज्याचा. अशा रीतीनें भारतांतील सर्व राज्यें प्रामुख्यानें एकभाषिक प्रदेशाचीं बनवून मुंबई राज्य तेवढेंच द्विभाषिक ठेवण्यांत आलें.

## महाराष्ट्राची भयंकर निराशा

अहवाल ता. १० आक्टोबरला अधिकृतपणें प्रसिद्ध झाला तरी त्याचा गोषवारा किंवा त्यांतील महत्त्वाच्या शिफारसी त्यापूर्वी आठदहा दिवस अनधिकृतपणें कां होईना वृत्तपत्रांतून बाहेर फुटल्या होत्या. किंबहुना शिफारसी एकदम कळल्यानंतर जनतेमध्यें होणारी तीव्र प्रतिक्रिया अंदाजून त्या हळूहळू अनधिकृतपणें प्रसृत करून नंतर अधिकृतपणें जाहीर केल्यास जनतेची प्रतिक्रिया तेवढी तीव्र व प्रक्षोभक होणार नाहीं असें पद्धतशीर धोरण ठरवूनच कीं काय सरकारनें ही प्रसिद्धीची योजना आंखली असें वाटतें. मुंबई सरकारनें या प्रसिद्धीच्या वेळीं एवढा पोलीस-बंदोबस्त ठेवला होता कीं जनतेला या शिफारसी आवडणार नाहींत असें सरकारला आधींच कळलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण या वेळीं लोक कांहीं प्रक्षोभक अगर अत्याचारी कृत्यें करून आपली नापसंती व्यक्त करतील हा सरकारचा अंदाज मात्र खोटा ठरला. उलट,










अनुक्रमणिका

कमिशनच्या शिफारसींपेक्षां ठेवलेला पोलीस-बंदोबस्तच लोकांमध्यें प्रक्षोभ उत्पन्न करीत आहे असें वाटूं लागलें. महाराष्ट्रांतील यच्चयावत् राजकीय पक्षांनीं व प्रमुख व्यक्तींनीं महाराष्ट्रासंबंधींच्या शिफारसींचा धिक्कार केला. एकादादुसरा अपवाद वगळल्यास बहुतेक मराठी वृत्तपत्रांनींहि त्याबद्दल तीव्र नापसंती व्यक्त केली. कांहीं तत्त्वें अगर सिद्धांत मूलभूत मानून त्याप्रमाणें समितीनें आपल्या शिफारसी केल्या आहेत असें दिसलें नाहीं. संबंधित प्रश्नांचा त्यांनीं साकल्यानें विचार केलेला असला तरी महत्त्वाच्या किंवा वादग्रस्त प्रश्नासंबंधानें घेतलेले निर्णय न्यायदृष्टीपेक्षां राजकीय दृष्टीनेंच घेतलेले आहेत असें दिसून आलें. भाषा-वारीचें तत्त्व त्यांनीं तात्त्विक दृष्ट्या आधारभूत मानलें नसलें तरी प्रत्यक्ष घेतलेले निर्णय पाहतां बहुतेक सर्व ठिकाणीं हें तत्त्व आधारभूत मानून राज्यांची रचना सुचविली आहे असें दिसून आलें. दोन राज्यांच्या सरहद्दीवरील प्रदेशासंबंधाचे निर्णय मुख्यतः भाषिक तत्त्व पुढें ठेवूनच घेतलेले दिसले. भाषिक तत्त्व लागू करतांना किमान प्रादेशिक घटक एक गांव धरावें हें तत्त्व त्यांनीं मान्य केलें नसलें तरी त्यापेक्षां मोठा असा तालुका अगर जिल्हा हा घटक घेतांना त्यांनीं ही वाटणी भाषिक तत्त्वानुसार प्रामुख्यानें केल्याचें दिसून येत आहे. किंबहुना द्विभाषिक मुंबई राज्याचा निर्णय देण्यास अगर सरहद्दीवरील कांहीं अपवादात्मक ठिकाणीं निर्णय देण्यास अडचणीचें भासूं नये याचसाठीं केवळ हें भाषावारीचें तत्त्व आधारभूत मानण्यांत आलें नाहीं असें दिसून येतें. समितीच्या शिफारसी जाहीर करण्यांत आल्या त्या वेळीं सरकारतर्फें असें सांगण्यांत आलें कीं, 'याबाबत अंतिम निर्णय अखेर पार्लमेंटच घेईल. एवढ्या श्रेष्ठ, विद्वान् व्यक्तींच्या समितीनें दीड वर्षें श्रम घेऊन व या प्रश्नाचा सर्वांगीण अभ्यास करून जो निर्णय दिला आहे त्याचा सर्वांनीं शांतपणानें विचार करावा. कांहीं निर्णय संबंधित लोकांना पसंत नसल्यास त्यांच्या भावना व विचार लक्षांत घेऊन सर्वसंमत असा मार्ग काढण्याचा प्रयत्न केला जाईल व अंतिम निर्णय अर्थात् पार्लमेंटच देईल.'

अहवाल प्रसिद्ध झाल्यावर ता १२।१३ आक्टोबर-ला कॉंग्रेस वर्किंग कमिटीची बैठक झाली व त्यांत या अहवालावर चर्चा झाली. महाराष्ट्र प्र. कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. देवगिरीकर यांनीं या शिफारसीमुळें महाराष्ट्राची केवढी तीव्र निराशा झाली आहे हें वर्किंग कमिटीच्या निदर्शनास आणलें. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची मागणी कशी न्याय्य व तर्कशुद्ध आहे हें त्यांनीं वर्किंग कमिटीसमोर अत्यंत मुद्देसूदपणें मांडलें. समितीच्या शिफारसीमुळें निर्माण झालेली निराशा दूर करण्यासाठीं महाराष्ट्रांतील संयुक्त महा-राष्ट्रवादी कॉंग्रेस नेत्यांना वाटाघाटीस बोलवावें अशी त्यांनीं सूचना केली. त्याप्रमाणें श्री. शंकरराव देव, श्री. भाऊसाहेब हिरे, श्री. काकासाहेब गाडगीळ, श्री. यशवंतराव चव्हाण, श्री. नानासाहेब कुंटे व डॉ. नरवणे ही मंडळी दिल्लीस वाटाघाटींसाठीं गेली. श्री. देवगिरीकर व पाटसकर ही मंडळी तेथें होतीच.

## मोठ्या द्विभाषिक राज्याचा पर्याय

ता. १७ ते १९ आक्टोबरपर्यंत त्यांच्या या वाटा-घाटी चालूं होत्या. या मंडळीतर्फें श्री. शंकरराव देवांनीं महाराष्ट्राची बाजू पं. नेहरू, पं. पंत, मौ. आझाद व कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. ढेबर या कॉंग्रेस वरिष्ठांपुढें मांडली. अत्यंत सलोख्याच्या व बंधुत्वाच्या वातावरणां-त या वाटाघाटी झाल्या. श्री. शंकरराव देवांनीं आपली बाजू अत्यंत कळकळीनें, मुद्देसूदपणें व गांधी-अनुयायास साजेश्या उच्च पातळीवरून मांडली. आपल्या मागण्यांतील न्याय्यता व नैतिकता मान्य केली जावी असें त्यांनीं आग्रहानें सांगितलें. ती एकदां मान्य केल्यावर त्याप्रमाणें प्रत्यक्ष व्यवस्था करतांना कांहीं अडचणी येत असल्यास त्याचें निवारण परस्पर-विचारानें व सोईनें होऊं शकतें, असेंहि त्यांनीं सांगि-तलें. पं. नेहरू व इतर कॉंग्रेस-श्रेष्ठींवर शंकररावजींच्या निवेदनाचा प्रत्यक्ष फलनिष्पत्तीच्या दृष्टीनें काय परि-णाम झाला हें सांगणें कठीण आहे. कारण, या निवे-दनाचा त्यांच्यावर कांहीं परिणाम झाला असें म्हणावें तर त्यावेळीं त्यांनीं सुचविलेला पर्याय व पुढें त्यांनीं वेळोवेळीं स्वीकारलेलें धोरण पाहतां शंकररावजींचें म्हणणें त्यांनीं शांतपणानें ऐकून घेतलें, एवढेंच. यापेक्षां अधिक कांहीं परिणाम झाला असावा असें दिसत नाहीं. मराठी-भाषिकांच्या आकांक्षांच्या न्याय्यतेबद्दल व त्यांच्या उदात्त हेतूबद्दल पंडित नेहरू व त्यांचे सहकारी यांनीं निर्वाळा दिला म्हणून आनंद मानावा







तर पुढें त्यांनीं याबाबत टाकलेलीं पावलें अनाकलनीय व विसंगत दिसतात. महाराष्ट्राची मागणी लगेच मान्य करण्यांत काय अडचणी आहेत हें काँग्रेसश्रेष्ठींनीं विशद करून सांगितलें व व्यापक आणि राष्ट्रहितैषी दृष्टीनें या प्रश्नाचा विचार करणें आवश्यक आहे यावर त्यांनीं भर दिला. चर्चेच्या ओघांत त्यांनीं महाराष्ट्रीय पुढाऱ्यांपुढें त्रि-राज्याची योजना मांडली. सौराष्ट्र, कच्छ व मुंबई राज्यां-तील सर्व गुजरातीभाषी प्रदेशांचें मिळून होणारें महा-गुजरात राज्य, मुंबईशहराखेरीज मुंबई राज्यांतील सर्व मराठीभाषी प्रदेश, हैद्राबाद राज्यांतील मराठवाडा व विदर्भाचे आठ जिल्हे मिळून होणारें संयुक्त महाराष्ट्र-राज्य व तिसरें मुंबई शहर राज्य अशी ही त्रिराज्य–योजना होती. पांच वर्षांनंतर मुंबईशहर महाराष्ट्रांत समाविष्ट करावयाचें कीं पुढें तसेंच वेगळें ठेवावयाचें याचा पुनः विचार करतां येईल असेंहि सांगण्यांत आलें. अर्थात् ही योजना महाराष्ट्रीय पुढारी–मंडळींना संमत होण्यासारखी नव्हती. शांततेच्या व सदिच्छेच्या वातावरणांत हा प्रश्न सोडवावा हें काँग्रेस वरिष्ठांचें आवाहन लक्षांत घेऊन व व्यापक राष्ट्रहिताच्या दृष्टीवर त्यांनीं जो भर दिला तोहि लक्षांत घेऊन संयुक्त महा-राष्ट्राचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटण्याच्या मार्गां-तील एक पायरी म्हणून शंकरराव देवांनीं मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र व महागुजरात या दोहोंचे मिळून म्हणजे सर्व मराठीभाषी व सर्व गुजरातीभाषी प्रदे-शांचे मिळून एक द्विभाषिक राज्य करण्यांत यावें अशी पर्यायी योजना काँग्रेस वरिष्ठांसमोर मांडली. ही पर्यायी योजना तेथें गेलेल्या कांहीं महाराष्ट्रीय पुढाऱ्यांना बिल-कूल पसंत नव्हती. भाषिक राज्याचें मूलभूत तत्त्व आपण सोडून देत आहोंत असें त्यांचें म्हणणें होतें व प्रत्यक्ष व्यवहारांत असें राज्य कार्यक्षम रीतीनें चालविणें शक्य होणार नाहीं असेंहि त्यांना वाटत होतें. रा. पु. समितीनें महाविदर्भाचें वेगळें राज्य शिफारसिलें होतें. काँग्रेस वरिष्ठांनीं त्रिराज्ययोजना सुचविली, त्यावेळीं विदर्भाचें वेगळें राज्य न करतां तेथील लोकांनीं संयुक्त महाराष्ट्रांत सामील होण्याबाबत त्यांचें मन वळविण्याचें आश्वासन देऊन त्यांनीं ती जबाबदारी स्वीकारली होती. परंतु महत्त्वाचें मुंबई शहर त्यांत नसल्यामुळें ही योजना स्वीकारणें महाराष्ट्रीयांना शक्य नव्हतें. तेव्हां जेणेंकरून मुंबईसह सर्व मराठीभाषी प्रदेश एका राज्यांत येईल व एकप्रकारें संयुक्त महाराष्ट्रा-चा गाभा तयार होईल अशी सर्व मराठीभाषी व सर्व गुजरातीभाषी प्रदेश एकत्र आणणारी द्विभाषिक राज्याची पर्यायी योजना श्री. शंकरराव देवांकडून पुढें मांडण्यांत आली. या द्विभाषिक राज्यांतून महागुजरात-नें पांच वर्षांनीं किंवा त्यापूर्वींही त्यांची तशी इच्छा असल्यास बाहेर पडावें, अशीहि योजनेंत तरतूद होती. तसें झाल्यास मग महागुजरात व मुंबईसह संयुक्त-महाराष्ट्र अशीं दोन राज्यें आपोआप निर्माण होतील. ज्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचा यास विरोध होता त्यांनींहि अखेर त्यास संमति दिली. पण त्यावेळीं तेथें जे गुजरातचे पुढारी आले होते त्यांनीं आपणांस असलें द्विभाषिक राज्य मान्य होणार नाहीं, यांत महाराष्ट्रीयांचें उघडउघड दोन तृतीयांशाइतकें संख्याधिक्य आहे व पांच वर्षांनीं महागुजरातला फुटून वेगळें होण्याची दिलेली सवलत म्हणजे या संख्याधिक्याच्या जोरावर महागुजरातला बाहेर हांकलून काढण्याची आंखलेली पद्धतशीर योजना असून मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र पुढें आपोआप पदरांत पडावा अशा दुष्ट काव्यानें ती करण्यांत आली आहे असें त्यांनीं बोलून दाखविलें. मुंबई काँग्रेसच्या पुढाऱ्यांनींहि ती संमति दर्शविली नाहीं. काँग्रेस वरिष्ठांची यावरील अधिकृत प्रतिक्रिया त्यावेळीं कळली नसली तरी ही द्विभाषिकराज्ययोजना मान्य होण्यासारखी नाहीं असें पं. पंतांनीं महाराष्ट्रीय पुढाऱ्यांना दिल्ली सोडण्यापूर्वी कळविलें होतें, असें कळतें. फक्त श्री. ढेबर म्हणाले होते कीं, योजना विचार करण्यासारखी असून, कांहीं काळ विचारासाठीं ती ठेवण्यास हरकत नाहीं. अशा रीतीनें महाराष्ट्रीय पुढारी दिल्लीहून परतले त्यावेळीं त्यांच्यापुढें काँग्रेस वरिष्ठांची त्रिराज्य – योजना व त्यांनीं सुचविलेली सर्व मराठी व सर्व गुजराती-भाषी प्रदेशांची द्विभाषिक – राज्य – योजना असे दोन पर्याय होते. रा. पु. समितीनें सुचविलेलें द्विभाषिक राज्य मागें पडलें होतें.

वाटाघाटींसाठीं दिल्लीस गेलेली महाराष्ट्र काँग्रेसची पुढारीमंडळी १९ ऑक्टोबरला परतली. ता. २० रोजीं पुणें येथें महाराष्ट्र प्रदेश काँ. कमिटीच्या कार्य-कारिणीची व ता. २१ रोजीं सर्वसाधारण – सभेची








बैठक झाली. कॉंग्रेसवरिष्ठांशीं झालेल्या चर्चेचा वृत्तांत त्यांनीं कथन केला व शंकरराव देवांच्या मुंबईसह सर्व मराठीभाषी व सर्व गुजरातीभाषी प्रदेश एकत्र आणणाऱ्या द्विभाषिक राज्याच्या पर्यायास महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेसनें ठराव करून पाठिंबा दिला. रा. पु. समितीच्या शिफारसीबाबतहि ठराव करून संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीबाबत समितीचा दृष्टिकोण चुकीचा असून त्यांनीं दिलेले निर्णय मराठी भाषिकांना अन्याय करणारे आहेत असें स्पष्ट नमूद करून रा. पु. समितीनें सुचविलेल्या द्विभाषिक मुंबई राज्याची योजना महाराष्ट्र प्र. कॉंग्रेसला नामंजूर आहे असें त्या ठरावांत म्हटलें. तसेंच कॉंग्रेस वरिष्ठांनीं सुचविलेला त्रिराज्य – योजनेचा पर्यायहि आपणांस पसंत नाहीं असें त्या ठरावांत म्हटलें व मुंबई शहराची भौगोलिक रचना व त्याचा महाराष्ट्राशीं असणारा सामाजिक आणि आर्थिक संबंध लक्षांत घेतां, तसेंच खुद्द रा. पु. समितीनेंहि मुंबईचें वेगळें शहर-राज्य करण्याविरुद्ध केलेला समर्पक युक्तिवाद लक्षांत घेऊन मुंबईचें वेगळें शहर-राज्य म. प्र. कॉंग्रेस कमिटीस संमत नाहीं असेंहि त्या ठरावांत स्पष्टपणें म्हटलें आहे. शंकरराव देवांच्या द्विभाषिक राज्य-योजनेस महाराष्ट्र प्र. कॉंग्रेसचा अखेर पाठिंबा मिळाला तरी तो देतांना कार्यकारिणीच्या सभासदांत बरीचशी चर्चा झाली. विरोध असणाऱ्यांनींहि पाठिंबा दिला तो केवळ एक डाव ( स्ट्रॅटेजी ) म्हणून व जवळजवळ हा पर्याय संबंधित पक्षांना मान्य होणार नाहीं या अंदाजानें दिला असावा असें वाटतें. पुढें घडलेल्या कांहीं घटनाहि या विधानास बळकटी आणतात. एकभाषिक तत्त्व आपण सोडलें नसलें तरी कॉंग्रेसश्रेष्ठींनीं सुचविल्याप्रमाणें व्यापक राष्ट्रहिताच्या दृष्टीनें या द्विभाषिक राज्याचा प्रयोग आपण प्रामाणिक-पणें करून पाहावा अशी श्री. शंकरराव देवांची भूमिका दिसली. या भूमिकेवरूनच पुढें श्री. शंकररावजी या द्विभाषिक राज्याचा प्रचार करीत राहिले.

### संयुक्त-महाराष्ट्र-परिषदेच्या कार्यकारिणींतील मतप्रवाह

महाराष्ट्र-प्रदेश-कॉंग्रेस-कमिटीच्या सभेनंतर संयुक्त-महाराष्ट्रपरिषदेच्या कार्यकारिणीची सभा मुंबई येथें ता. २३ ऑक्टोबर रोजीं भरली. कार्यकारिणीच्या या सभेंत रा. पु. समितीच्या अहवालसंबंधानें एक दहा-कलमी ठराव मंजूर करण्यांत आला. या ठरावांत, शिफारसींचा एकूण परिणाम म्हणून रचना जवळजवळ पूर्णपणें भाषिक तत्त्वानुसार होत असल्याबद्दल व हैद्राबाद व मध्यप्रदेश यांचें विभजन होत असल्या-बद्दल समाधान व्यक्त करण्यांत आलें. तसेंच तेलगू व मराठी यांलेरीज इतर सर्व प्रादेशिक भाषांचे प्रदेश ( अर्थात् हिंदी भाषा सोडून ) एका राज्यांत येत असल्याबद्दल व तेलगूभाषिकांना पुढें एकत्र एका राज्यांत येण्याची मुभा दिल्याबद्दल समाधान व्यक्त केलें. राज-प्रमुखपद नष्ट केल्याबद्दल व राज्यांच्या दर्जांतील भेदाभेद नाहींसा केल्याबद्दल समाधान व्यक्त केलें, मराठी-भाषिकांच्या बाबतींत तेवढा वेगळा न्याय लागू करून सर्व मराठीभाषिकांचें एक राज्य न केल्याबद्दल व पुढेंहि त्यांना एकत्र येण्याची इतरांप्रमाणें संधि न ठेवल्याबद्दल खेद व्यक्त करण्यांत आला, व विदर्भाचें वेगळें राज्य करण्यासाठीं दिलेलीं कारणें अत्यंत पक्ष-पाती असून एकाच मराठीभाषिक राज्यांत येण्याची बहुसंख्य विदर्भीयांची इच्छा डावलल्याबद्दल सं. म. परिषदेच्या कार्यकारिणीनें खेद व्यक्त केला. मुंबई-शहर महाराष्ट्रापासून वेगळें काढणें अशक्य आहे, हें रा. पु. समितीनें कबूल करून त्या शहरांतील अल्पसंख्याक जमातींना आवश्यक तें संरक्षण देण्याची सं. म. परिषदेनें मांडलेली योजना समितीला पटत असली तरी कांहीं अल्पसंख्य जमातींच्या मोघम आरोपांना व भीतीला अवास्तव महत्त्व देऊन मुंबईसह संयुक्तमहाराष्ट्राची मागणी नाकारण्यांत आल्याबद्दल सं. म. प. कार्यकारिणीनें खेद व्यक्त केला व ज्या पद्धतीनें हा निर्णय देण्यांत आला त्यामुळें संघराज्याच्या एका घटकाची बदनामी करून संघराज्याच्या मूलभूत पायावरच आघात करण्यांत आला आहे असें नमूद केलें. मुंबईसह संयुक्तमहाराष्ट्राच्या मागणीचा पुनरुच्चार करून ती मिळविण्यासाठीं सर्व शांततेच्या व सनदशीर मार्गांनीं प्रयत्न करण्याबद्दल लोकांना आवाहन केलें, बेळगांव, कारवार वगैरे सरहद्दींवरील मराठी-भाषी प्रदेशाबद्दलचे समितीचे निर्णय चुकीचे असून कोणत्या-हि तर्कशुद्ध पायावर ते देण्यांत आले नाहींत हें नमूद केलें, व शेवटीं महाराष्ट्र-प्रदेश-कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं कॉंग्रेस वरिष्ठांशीं केलेल्या वाटाघाटींची दखल घेऊन महाराष्ट्रापासून मुंबई वेगळी काढण्याच्या योजनेस








त्यांनीं जो विरोध केला त्यास पाठिंबा दर्शविला. पण महाराष्ट्र-कॉंग्रेसनें सर्व मराठी-गुजरातीभाषिकांच्या द्विभाषिक राज्याच्या जो ठराव केला त्यास पाठिंबा न देतां फक्त त्याची दखल घेतली व गुजराती भाषिकां-च्यापेक्षां मराठीभाषिकांना वेगळा न्याय लागू करून त्यांना एका राज्यांत न आणतां त्यांची विभागणी करून त्यांच्या न्याय्य आकांक्षा धुडकावण्याच्या समितीच्या पक्षपाती धोरणाचा उल्लेख केला.

सं. म. परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या या बैठकीं-त प्र. कॉंग्रेसनें मंजूर केलेल्या द्विभाषिक राज्याच्या ठरावास पाठिंबा द्यावा असा एक विचारप्रवाह दिसून आला. पण असा पाठिंबा देणारा ठराव करणें हें संयुक्त-महाराष्ट्रपरिषदेच्या ध्येयाशीं विसंगत झालें असतें. तसेंच या बैठकींत हजर असलेल्या कॉंग्रेस पक्षाच्या लोकांनींहि असें सांगितलें कीं सं. म. परिषदेनें त्यास पाठिंबा देण्याची गरज नाहीं, कॉंग्रेस-संघटनेनें विशिष्ट परिस्थिति लक्षांत घेऊन तो ठराव केलेला आहे व त्यास यश कितपत येईल याची-हि खात्री नाहीं; अशा परिस्थितींत स्वतःच्या ध्येयाशीं विसंगत असा सं. म. परिषदेनें ठराव करण्याची गरज नाहीं इतर-पक्षीय सदस्यांचा या द्विभाषिक योजनेस विरोधच होता. या परिस्थितींत खुद्द कॉंग्रेस-पक्षीयांनींच वरीलप्रमाणें भूमिका घेतल्यामुळें वादंगाचा प्रसंग आपोआप टळला. ठरावांत फक्त त्या घटनेची दखल घेण्यांत आली. संयुक्त-महाराष्ट्रपरिषदेचें पुढील कार्य व धोरण यासंबंधानेंहि नंतर चर्चा झाली. येथपर्यंत निवेदन सादर करण्याचीच मुख्य कामगिरी परिषदेनें करावयाची होती. त्यामुळें येथपर्यंत परिषदेस सर्व-पक्षीय भूमिकेवरून हें काम करणें शक्य झालें. पण आतां रा. पु. समितीचा निर्णय संयुक्त-महाराष्ट्र-निर्मि-तीच्या विरुद्ध गेल्यामुळें सं. महाराष्ट्र निर्माण करण्या-साठीं प्रत्यक्ष कृति करण्याची वेळ आली. परिषदेंत सामील झालेल्या निरनिराळ्या राजकीय पक्षांचीं धोरणें पाहतां, प्रत्यक्ष कृतीचे बाबतींत अगर चळवळी-साठीं परिषदेचें सर्वपक्षीय व्यासपीठ कितपत टिकूं शकेल याची शंका निर्माण झाली. विशेषतः कॉंग्रेस-पक्षीय मंडळी निवेदन करण्याच्या मर्यादेपर्यंतच इतर-पक्षीयांशीं सहकार्य करूं शकतील, या अर्थाची कॉंग्रेस वरिष्ठांनीं त्यांवर लादलेली अट त्यांनीं मान्य केली असल्यामुळें निवेदनानंतर प्रत्यक्ष कोणत्याहि प्रकारच्या सर्वपक्षीय चळवळींत ही मंडळी सहभागी होऊं शकणार नाहींत असें दिसून आलें. परिषदेचें ध्येय व घटना पाहतां परिषद् प्रत्यक्ष चळवळीचा कार्यक्रम हातीं घेऊं शकत असली तरी तिचें सर्वपक्षीय स्वरूप टिकवा-वयाचें तर तिला प्रत्यक्ष चळवळीचा कार्यक्रम हातीं घेतां येणार नाहीं असें दिसून आलें. परिषदेंत सामील झालेल्या कांहीं अपक्षीय मंडळीं-तहि प्रत्यक्ष चळवळीच्या कार्यक्रमांत भाग घ्यावयाचा नसल्यास त्यांनाहि बाहेर पडावें लागेल. ही सर्व परिस्थिति लक्षांत घेऊन व संयुक्त महाराष्ट्रा-चा प्रश्न अजून वाटाघाटीच्या अवस्थेंत आहे ही गोष्टहि लक्षांत घेऊन परिषदेचें कार्य तात्पुरतें स्थगित करण्यांत यावें व परिषदेच्या कोणाहि सभासदास व्यक्तिशः अगर संघटितपणें आपापल्या राजकीय पक्षाच्या व्यासपीठावरून सर्व शांततेच्या व लोकशाही मार्गांनीं प्रत्यक्ष चळवळ करण्याचें क्रियास्वातंत्र्य असावें व यापुढें परिषदेचे सर्वाधिकार अध्यक्ष श्री. शंकरराव देव यांचेकडे देण्यांत यावेत असा ठराव मंजूर कर-ण्यांत आला.

## गुजरात प्र. कॉं. कमिटीचें मत

यानंतर कांहीं दिवसांनीं मेमदाबाद येथें गुजरात प्र. कॉंग्रेस कमिटीची सभा झाली व रा. पु. समितीच्या द्विभाषिक मुंबई राज्यास त्यांनीं पाठिंबा दिला. व असें द्विभाषिक राज्य बनविणें शक्य नसल्यास महागुजरा-तचें वेगळें राज्य बनवावें व त्याचबरोबर मुंबई शहरा-चेंहि वेगळें राज्य बनवावें, मुंबईशहर कोणत्याहि भाषिक राज्यांत घालूं नये असा त्यांनीं ठराव केला. महाराष्ट्र प्र. कॉंग्रेसनें मंजूर केलेल्या द्विभाषिक राज्याच्या योजनेस त्यांनीं जोराचा विरोध केला. खोटी, दुष्ट-पणाची व कावेबाज अशी ही योजना असून गुजराती भाषिकांवर सतत वर्चस्व करण्याचा अगर त्यांना पुढें त्यांतून हाकून लावून मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचें आपलें ध्येय साधण्याचा हा डाव आहे असें त्यांनीं मत प्रदर्शित केलें. किंबहुना यापुढें त्रिराज्य–योजनाच अमलांत आणावी, रा. पु. समितीचें द्विभाषिक राज्यहि यापुढें बनविणें श्रेयस्कर होणार नाहीं असें कमिटीचें मत दिसून आलें. मुंबई-प्रदेश–कॉंग्रेस कमि-टीनेंहि रा. पु. समितीच्या द्विभाषिक राज्यास पाठिंबा










देणारा व महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेसच्या द्विभाषिक राज्यास विरोध दर्शविणारा ठराव पास केला.

### श्री. देव यांचा प्रचार

महाराष्ट्र-प्रांतिक-कॉंग्रेसकमिटीनें सर्व मराठी-गुजरातीभाषिकांच्या द्विभाषिक राज्याचा ठराव मंजूर केल्यानंतर श्री. शंकरराव देवांनीं त्याचा प्रचार करण्यासाठीं मुंबईंत व इतरत्र मोठमोठ्या सभा घेतल्या. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या निमितींतील एक मधला टप्पा याच दृष्टीनें बहुतेक लोकांनीं त्याचा अर्थ घेतला. पण श्री. शंकरराव देव मात्र थोड्याफार तात्त्विक भूमिकेवरून या द्विभाषिक राज्याचा प्रचार करीत असल्याचें दिसून आलें. मुंबईंत त्यांच्या सभांना प्रचंड गर्दी जमू लागली व संयुक्तमहाराष्ट्रनिर्मितीबाबत त्यांच्या नेतृत्वावरील विश्वास वाढत आहे असें दिसूं लागलें. विदर्भाकडेहि शंकररावजींनीं दौरा केला. नागपूर येथें त्यांना प्रचंड विरोधास तोंड द्यावें लागलें व त्यांच्यावर तेथें शारीरिक हल्लाहि झाला. रा. पु. समितीनें शिफारसिलेलें विदर्भाचें वेगळें राज्य मंजूर असणारा एक प्रभावी गट तिकडे होता, तसेंच संयुक्त महाराष्ट्रांत विदर्भानें विलीन व्हावें असेंहि बरेंच मत होतें. विशेषतः वऱ्हाडच्या चार जिल्ह्यांत हें मत प्रभावी होतें व तेथील कॉंग्रेस – कमिटीनें तसा ठरावहि मंजूर केला होता. पण नागपूरकडील चार जिल्ह्यांत हें मत एवढें प्रभावी नव्हतें. पण विदर्भाकडील बहुतेकांना म. प्र. कॉंग्रेसची द्विभाषिक राज्ययोजना पसंत नव्हती. तिकडील संयुक्तमहाराष्ट्रवादी लोकमत असें होतें कीं, " कॉंग्रेस-श्रेष्ठींची त्रिराज-योजना तूर्त स्वीकारावी, पुढें मुंबई मिळेल, पण कोणत्याहि परिस्थितींत पुनः द्विभाषिक राज्यांत यापुढें जाण्याची पाळी येऊं नये." रा. पु. समितीनें हैद्राबादराज्याचें विभजन करून मराठवाडा मुंबई राज्यांत सामील करण्याची शिफारस केली असल्यामुळें त्यांचें ध्येय एकप्रकारें साध्य झालेंच होतें. तेव्हां यापुढें मुंबई राज्यांतील मराठीभाषिकांच्या धोरणानुसारच ते वागणार हें उघड होतें. श्री. शंकरराव देवांची द्विभाषिक-राज्य-योजना फलद्रूप होणार नाहीं, अखेर त्यांना मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याचीच तयारी करावी लागेल, असेंच बहुसंख्य मराठीभाषी जनतेस वाटत असल्यामुळें या त्यांच्या योजनेस विरोध करण्याचे भानगडींत फारसें कोणी पडलें नाहीं. बहुतेक राजकीय पक्षांनाहि असेंच वाटत होतें. तथापि श्री. शंकररावांप्रमाणें या योजनेवर तात्त्विक निष्ठा ठेवून असें द्विभाषिक राज्य निर्माण झाल्यास चांगलें अशा विचारसरणीचीहि कांहीं प्रमुख मंडळी महाराष्ट्रांत, मुंबईंत व महाराष्ट्राबाहेरहि दिसून आली.

### त्रिराज्य – योजना :
### मान्यहि नाहीं, अमान्यहि नाहीं !

ता. ८ व ९ नोव्हेंबरला दिल्लीस कॉंग्रेस–वर्किंग-कमिटीची बैठक भरून त्यामध्यें राज्यपुनर्रचनेबाबत निर्णय घेण्यांत आला. मुंबई राज्याबाबत रा. पु. समितीची शिफारस बाजूस सारण्यांत येऊन महागुजरात, मुंबई शहर व विदर्भासहित मुंबई राज्यांतील सर्व मराठीभाषी प्रदेश व मराठवाडा मिळून होणारें महाराष्ट्र-राज्य अशा तीन वेगळ्या राज्यांची योजना संमत करण्यांत आली. महाराष्ट्र प्र. कॉंग्रेसनें सुचविलेली द्विभाषिक राज्ययोजना संबंधित पक्षांना पसंत नाहीं म्हणून ती फेटाळण्यांत आली. कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. ढेबर यांनीं 'पांचवर्षांनंतर म्हणजे १९६२ सालीं मुंबईशहरराज्याच्या विधिमंडळांतील दोनतृतीयांश सदस्यांच्या बहुमतानें मुंबईशहर महाराष्ट्रांत विलीन करण्याची सवलत राहील' असें लेखी पत्रानें महाराष्ट्र प्र. कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. देवगिरीकर यांना कळविलें. विवाद्य बाबींपैकीं पंजाब व विशाल आंध्र यांबाबत निर्णय घेण्यांत आले नाहींत. इतर बहुतेक ठिकाणीं रा. पु. समितीनें केलेल्या शिफारसींना मान्यता देण्यांत आली. संबंधित पक्षांनीं परस्परमतैक्यानें कांहीं बदल सुचविल्यास तोहि मान्य करण्यांत येईल असें सांगितलें गेलें. म्हैसूरच्या लोकांचा संयुक्त कर्नाटकास विरोध होता. त्यासंबंधीं प्रत्यक्ष निर्णय घेतला नाहीं; तरी म्हैसूरच्या लोकांचें मन वळवून संयुक्त कर्नाटकास त्यांचा पाठिंबा मिळण्याची शक्यता दिसूं लागली होती. विदर्भ संयुक्त महाराष्ट्रांत विलीन करण्यापूर्वी तेथील लोकमत अंदाजलें जाईल, ते विलीनीकरणास संमति देतील व त्यासाठीं खुद्द कॉंग्रेस-वरिष्ठ आपलें वजन खर्च करतील असेंहि त्या वेळीं सांगण्यांत आलें.

कॉंग्रेस-वर्किंग-कमिटीचा हा निर्णय महाराष्ट्रांतील कॉंग्रेससह कोणत्याहि राजकीय पक्षाला मान्य नव्हता. श्री. देवगिरीकरांनीं वर्किंग कमिटींत त्यास कशी









कबुली दिली याबद्दल महाराष्ट्रांत आश्चर्य व्यक्त करण्यांत आलें. श्री. देवगिरीकरांनीं खुलासा केला कीं आपण संमति दिलेली नाहीं. संमति दिली नसली तरी आपलें विरोधी मत नोंदविण्याचा आग्रह त्यांनीं धरला नव्हता. वर्किंग कमिटीचा हा निर्णय आपल्या प्रदेश-कॅांग्रेस कमिटीपुढें ठेवतों असें ते म्हणाले होते. त्याच वेळीं दिल्लींत असणाऱ्या कांहीं कॅांग्रेसपक्षीय महाराष्ट्रीय पार्लमेंट-सदस्यांनीं पं. पंत वगैरे कॅांग्रेस-वरिष्ठांस भेटून या त्रिराज्य-योजनेस महाराष्ट्र-प्रदेश-कॅांग्रेस-कमिटीचा पाठिंबा मिळविण्याचा प्रयत्न करूं असें सांगितलें होतें असें म्हणतात. श्री. देवगिरीकर दिल्लीहून परतल्यावर त्यांनीं श्री. शंकरराव देव व इतर महाराष्ट्र-कॅांग्रेसचे पुढारी यांना सर्व वृत्त कथन केलें. लगेच ता. १६ नोव्हेंबरला महाराष्ट्र प्र. कॅां. कार्यकारिणीची व ता. १७ नोव्हेंबरला तिच्या सर्वसाधारण सभेची बैठक पुण्यास बोलावण्यांत आली. विदर्भ व मराठवाड्यांतील कॅांग्रेसच्या प्रमुख मडळींना या बैठकीस बोलावलें होतें. कार्यकारिणींत या प्रश्नावर कित्येक तास चर्चा होऊन एक ठराव मंजूर करण्यांत आला. मुंबईशहराचें वेगळें राज्य करण्यापुरता त्रिराज्य-योजनेचा भाग वगळून बाकीची योजनेबद्दल — विदर्भ महाराष्ट्रांत विलीन करण्याचें ठरविल्याबद्दल समाधान व्यक्त करण्यांत आलें. सुरवातीस महाराष्ट्र प्र. कॅां. नें सुचविलेली द्विभाषिक राज्याची योजना संमत करण्यांत आली नाहीं, याबद्दल खेद प्रदर्शित करण्यांत आला. नंतर विदर्भ महाराष्ट्रांत विलीन करण्याचें ठरविल्याबद्दल व सर्व मराठी-भाषिकांचें राजकीय ऐक्य साधण्याचें स्वप्न बरेचसें साकार होत असल्याबद्दल समाधान व्यक्त केलें. — पण पुढें 'मुंबई शहराचें वेगळें राज्य करण्याची कल्पना आपणांस बिलकूल संमत नाहीं; भौगोलिक, सांस्कृतिक व आर्थिक वगैरे सर्व दृष्टींनीं मुंबई महाराष्ट्राचा अविभाज्य भाग असल्यामुळें मुंबईखेरीज महाराष्ट्र-राज्याची आम्ही कल्पनाहि करूं शकत नाहीं; तेव्हां मुंबई शहराबाबतच्या निर्णयाचा वर्किंग कमिटीनें फेरविचार करावा' — अशी त्या ठरावांत विनंति करण्यांत आली. पण ठरावाच्या अखेरीस मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचें ध्येय गांठण्याचे आपले मार्ग शांततेचे व मतपरिवर्तनाचेच राहतील, त्यासाठीं चळवळीचा मार्ग आपणांस संमत नाहीं व कोणत्याहि परिस्थितींत आम्ही कॅांग्रेसची शिस्त पाळून व कॅांग्रेसशीं एकनिष्ठ राहूनच आमचें साध्य गांठण्याचा प्रयत्न करूं असें म्हटलें होतें. ता. १७ रोजीं भरलेल्या प्रदेश कॅां. कमिटीच्या सर्वसाधारण सभेंत हा ठराव मंजूर करण्यांत आला.

या ठरावाचा अर्थ त्रिराज्य-योजना मान्यहि नाहीं व अमान्यहि नाहीं असा होतो अशी त्याबाबत सर्व-साधारण प्रतिक्रिया दिसून आली. आपणांस पसंत तेवढ्या भागापुरती संमति, इतर भागास विरोध असा त्याचा सरळ अर्थ होत होता. 'वर्किंगकमिटीची योजना एक संपूर्ण भाग असून त्यांतील कांहीं स्वीकार्य कांहीं अस्वीकार्य असें करतां येण्यासारखें नाहीं, ती एक तर संमत आहे म्हणा अगर असंमत आहे म्हणा' अशीच याबाबत राजधानीच्या वर्तुळांतील प्रतिक्रिया दिसून आली. महाराष्ट्रांतील इतर सर्व राजकीय पक्षांनीं या त्रिराज्य-योजनेस कडाडून विरोध केला व महाराष्ट्र प्र. कॅां. च्या धोरणाबद्दल नापसंती व्यक्त केली. चळवळीच्या व लढ्याच्या अर्थात् शांततामय व लोकशाही मार्गानेंच आपणांस मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचें ध्येय साध्य करावें लागेल, असे हे पक्ष म्हणूं लागले. तथापि या बाबतींत कॅांग्रेसपक्ष पुढारी-पण घेऊन, सनदशीर कां होईना, प्रत्यक्ष चळवळीचा कांहीं मार्ग ठरवीत असल्यास त्याच्या मार्गात कोणत्याहि प्रकारची अडचण येईल असें आपलें धोरण राहणार नाहीं अशी निरनिराळ्या राजकीय पक्षप्रमुखांनीं आपली विचारसरणी प्रगट केली होती.

रा. पु. समितीचा अहवाल जाहीर झाल्यानंतर व पुढें मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण करण्यास म्हणजे मुंबई महाराष्ट्रांत घालण्यास पं. नेहरू आदि कॅांग्रेस-वरिष्ठ फारसे अनुकूल नाहींत असें दिसून आल्यानंतर महाराष्ट्र — कॅांग्रेसमध्यें दोन प्रमुख विचारप्रवाह दिसून आले. एक विचारप्रवाह असा कीं मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचें ध्येय गांठण्यासाठीं जरूर पडल्यास घटनात्मक पेंचप्रसंग घडवून आणून व कदाचित् त्यासाठीं कॅांग्रेस-संघटनेबाहेर जावें लागलें तरी त्याची तयारी ठेवून हें ध्येय साध्य करून घ्यावें. दुसरा प्रवाह असा कीं मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र मिळविण्यासाठीं जें कांहीं करावयाचें तें कॅांग्रेसच्या शिस्तींत व संघटनेंत राहूनच करावयाचें, संघटनेबाहेर पडून कांहींहि करा-








वयाचें नाहीं. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राबद्दलच्या महाराष्ट्रीय जनतेच्या तीव्र भावना, तसेंच खुद्द सर्व सामान्य कॉंग्रेसजनांचेंहि याबाबतचें तीव्र मत लक्षांत घेतां पहिला विचारप्रवाह महाराष्ट्रकॉंग्रेसमध्यें प्रभावी होण्यासारखी परिस्थिति निर्माण होईल असें सुरवातीस वाटत होतें. पण ह्या लोकमतास बोलतें, कार्यक्षम व प्रभावी करणारें खंबीर नेतृत्व महाराष्ट्र-कॉंग्रेसमध्यें दिसून आलें नाहीं. म्हणून या विचार-प्रवाहानें मधून मधून उसळी खाल्ल्यासारखें दिसलें तरी तें क्षणिक ठरलें. दुसरा विचारप्रवाहच अखेर प्रभावी झाल्याचें दिसून येत आहे. श्री शंकरराव सध्यां कॉंग्रेस-संघटनेंत नाहींत. त्यांचें पूर्वीचें उच्च स्थान, पूर्वीचे संबंध व त्यांचें स्वतःचें व्यक्तिमत्त्व यांचे जोरावर त्यांना महाराष्ट्रकॉंग्रेसशीं निकट संबंध ठेवून व तिचें मार्गदर्शन करून जेवढें करतां येणें शक्य होतें तेवढें त्यांनीं करण्याचा प्रयत्न केला. तथापि वेळप्रसंग पडल्यास मुंबईसह संयुक्तमहाराष्ट्राचें ध्येय साध्य करण्यांसाठीं पहिल्या विचारप्रवाहाचा जोर वाढेल अशी शंकररावजींनीं निश्चित भूमिका घेतली होती कीं नाहीं हें कळण्यास मार्ग नाहीं. महाराष्ट्रकॉंग्रेसमध्यें फाटाफूट न होतां, बाहेर पडावें लागल्यास अ. भा. कॉंग्रेस-संघटनेंतून सबंध महाराष्ट्र-कॉंग्रेस बाहेर पडावी असें कदाचित् त्यांचें मत असावें. पण असें सर्वशः निर्गमन प्रत्यक्ष घडणें शक्य नव्हतें. महाराष्ट्र-कॉंग्रेसमधील वर उल्लेखिलेला पहिला विचारप्रवाह प्रभावी करण्यास क्रियात्मक नेतृत्व हवें होतें. तें असतें तर कदाचित् सर्व संघटनाच त्या मताची झाली असती. कांहीं अपवादात्मक व्यक्ती राहिल्या तरी त्यांस मग महत्त्व राहिलें नसतें. हें धाडसी नेतृत्व महाराष्ट्र-कॉंग्रेसमध्यें नव्हतें हें तर आतां स्पष्ट झालेंच आहे. परंतु असें कांहीं धाडस करण्याची आवश्यकता आहे हा विचार खुद्द शंकररावजींनीं आपल्या कॉंग्रेस-मित्रांसमोर आग्रहानें मांडला होता किंवा कसें हें कळत नाहीं.

**विधानसभेचें अधिवेशन. मोर्चा, गोळीबार !**

ता. १८ नोव्हेंबर रोजीं मुंबईस विधानसभेचें व विधानपरिषदेचें खास अधिवेशन रा. पु. समितीच्या शिफारसींचा विचार करून त्याबाबत आपलें मत मध्यवर्ती सरकारला कळविण्यासाठीं भरलें. त्यावरील चर्चेस सुरवात झाल्यावर त्रिराज-योजना या सभागृहास संमत आहे अशी उपसूचना कॉंग्रेसपक्षनेते श्री. मोरारजी देसाई यांनीं मांडली. महाराष्ट्राचा व मुंबई शहरांतील महाराष्ट्रीयांचा या योजनेस तीव्र विरोध होता. कॉंग्रेसेतर राजकीय पक्षांनीं पुढाकार घेऊन या योजनेच्या निषेधार्थ व विरोधी लोकमत प्रदर्शित करण्यासाठीं एक मोर्चा कौन्सिल हॉलवर नेला. मिरवणुकीस व मोर्च्यास बंदी होती तरी निरनिराळ्या मार्गांनीं लोकांचा प्रचंड जमाव तेथें जमला. पोलीसांनीं लाठीमार केला. अश्रु-वायु सोडला. से. बापट आदि प्रमुख व्यक्तींना पकडण्यांत आलें. विधानसभेंत व परिषदेंत विरोधी पक्षाच्या सभासदांनीं रा. पु. समितीच्या शिफारसीवर कडाडून हल्ला चढविला व वर्किंग कमिटीच्या त्रिराज्य-योजनेसहि जोराचा विरोध व्यक्त केला.

श्री शंकररावजी व इतर संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांच्या प्रचंड सभा मुंबईंत भरत व त्यांना लाखांच्या संख्येनें लोक हजर राहत हें पाहून मुंबई-प्रदेश-कॉंग्रेसला व तिचे प्रमुख श्री स. का. पाटील यांना आपलें मुंबइतील आसन डळमळतें कीं काय असें वाटूं लागलें. वर्किंग कमिटीनें त्रिराज्ययोजनेचा निर्णय घेतल्यावर त्याच्या प्रचारार्थ श्री. पाटील व मुंबई-कॉंग्रेस प्रत्यक्ष आखा-ड्यांत उतरली. ता. २० नोव्हेंबरला त्यांनीं वर्किंग कमिटीच्या ठरावास पाठिंबा देण्यासाठीं एक चौपाटी-वर जाहीर सभा बोलावली. सभेस प्रचंड गर्दी जमली. पण जवळचे कांहीं श्रोतेखेरीज सर्व जनसमुदाय सभेंत सतत व्यत्यय आणून आरडाओरड व गोंधळ करून सभा मोडण्यासाठीं आला होता असेंच दिसलें. संयुक्त महाराष्ट्राच्या बाजूनें व पाटीलविरोधी घोषणा होत होत्या. व्यासपीठाच्या रोखानें दगड, वाळू वगैरेंचा वर्षाव होत होता. अनेकांना जखमा झाल्या. सभेंतील लाऊडस्पीकर पाडले, कुंपणाचे बांबू मोडून त्यांना आग लावली. या गोंधळातच श्री. पाटील व मोरारजी-भाई यांचीं भाषणें झालीं. श्री. पाटील अत्यंत प्रक्षो-भक बोलले. पांच वर्षांनीं नव्हे तर पांच हजार वर्षांनीं देखील तुम्हांस मुंबई मिळणार नाहीं असे त्यांनीं उद्गार काढले. अत्यंत गोंधळांत सभा संपली. अनेकांना दंगल केल्याबद्दल पकडण्यांत आलें.

मुंबईंतील वातावरण तापत चाललें. ता. २१ रोजीं








पुनः ॲसेंब्लीची बैठक सुरूं झाली. त्या दिवशीं डाव्या गटाच्या पुढाऱ्यांनीं सार्वत्रिक संपाचा व हरताळाचा आदेश दिला. कौन्सिल-हॉलवर पुनः प्रचंड मोर्चा नेण्याचें ठरलें. संपांत यच्चयावत् कामगारवर्ग सामील झाला. सर्व कापड-गिरण्या, रेल्वेवर्क-शॉप, गोद्या व इतर लहानमोठे उद्योगधंदे यांतील कामगारवर्ग संप करून बाहेर पडला. फोर्टविभागांतील बँकांतील व कचेऱ्यांतील मध्यमवर्गीय नोकरहि मोठ्या प्रमाणांत बाहेर पडले. बऱ्याच भागांत हरताळानिमित्त दुकानें बंद राहिलीं. मोर्चाचा प्रचंड जमाव फ्लोराफौंऊटनजवळ अडविण्यांत आला. अश्रुधूर सोडला, लाठीमार केला, गोळीबार केला तरी जमाव हटेना. लोक संतप्त होऊन पोलिसावर दगड फेकूं लागले. गोळीबार जोरांत सुरूं झाला. फ्लोराफाऊंटनला रणभूमीचें स्वरूप आलें. इकडे असेंब्लींत रा. पु. समितीच्या अहवालावर चर्चा चालूं होती. बाहेरची परिस्थिति पाहून सदस्यहि अस्वस्थ झाले. शेवटीं अमूल देसाई, एस्. एम्. जोशी, नौशेर भरूचा वगैरे विरोधीपक्षीय सदस्य मोर्चातील लोकांना शांत करण्यास बाहेर पडले. ' तुमचें मत सभागृहास आम्ही कळविलें आहे. भाऊसाहेब हिरे व बरेच कॉंग्रेस सदस्य राजीनामे देत आहेत. राजीनामे देणाऱ्या कॉंग्रेस-सदस्यांची संख्या ८०।९० पर्यंत गेली आहे. आणखीहि देतील. तुम्ही आतां शांततेनें परत फिरा.' असें त्यांनीं मोर्चातील लोकांस सांगितलें. त्यानंतर हा दोन-अडीच लाखांचा जमाव शांततेनें चौपाटीकडे चालला. जातांना कांहीं गडबड झाली नाहीं. चोपाटीवर प्रचंड सभा झाली. २–३ लाखांचा समुदाय शांततेनें पुढाऱ्यांचीं भाषणें ऐकत होता. कामगारवर्गाबरोबर मध्यवर्गीय नोकरवर्गहि बऱ्याच मोठ्या प्रमाणांत होता. सभा संपल्यावर लोक शांततेनें घरी परत गेले. सभेंत डाव्या गटाच्या पुढाऱ्यांचीं भाषणें झालीं. या दिवशीं फ्लोराफौंटन व इतर भागांत झालेल्या गोळीबारांत १५।१६ माणसें मृत्युमुखीं पडलीं. प्रक्षुब्ध जमावानें बसेस व ट्राम यांची वाहतूक बंद पाडली. त्यांची मोडतोड केली व कांहीं बसगाड्या जाळण्यांत आल्या. या दिवशींच्या दंगलींत खाजगी मालमत्तेची लुटालूट, मोडतोड अगर जाळपोळ झाली नाहीं. फार तर एखाद्या-दुसऱ्या ठिकाणीं किरकोळ स्वरूपाची झाली असेल.

दुसऱ्या दिवशीं मुंबईतील सर्व व्यवहार नित्याप्रमाणें सुरू झाले. तसा आदेश चौपाटीवरील सभेंत पुढाऱ्यांनीं दिलाच होता. दंगलीची कसलीहि भीषण छाया दुसऱ्या दिवशींच्या व्यवहारावर दिसून आली नाहीं. दंगलीच्या दिवशींच म्हणजे ता. २१ पासून श्री. शंकरराव देवांनीं ता. २० च्या पाटील- मुरारजींच्या सभेंत जे हिंसात्मक व गर्ह्य प्रकार घडले त्याबद्दल प्रायश्चित्त म्हणून पांच दिवसांचें उपोषण सुरूं केलें होतें.

### कॉंग्रेसपक्षीय महाराष्ट्रीयांची अनुकंपनीय स्थिति !

ता. १८ रोजीं मुंबईस असेंब्ली-अधिवेशन सुरूं झालें. तेव्हांपासून कॉंग्रेसपक्षीय महाराष्ट्रीय सदस्यांत पक्षप्रमुखानें मांडलेल्या त्रिराज्य-योजनेस पाठिंबा देणाऱ्या उपसूचनेबाबत कोणतं धोरण स्वीकारावें याबद्दल चर्चा चालूं होती. मुंबई वेगळी करण्याची योजना आपणांस संमत नाहीं व त्याचा फेरविचार करावा असा प्रदेशकमिटीनें ठराव केला होता. पण पक्षातर्फे मांडलेल्या उपसूचनेच्या विरोधी बोलतां येणार नाहीं व विरोधी मत देतां येणार नाहीं असें असेंब्लींतील पक्षप्रमुखानें सांगितलें. वर्किंग कमिटीचा तसा आदेश आहे असें सांगण्यांत आलें. कॉंग्रेसपक्षीय महाराष्ट्रीय सदस्यांची स्थिति अनुकंपनीय झाली! कॉंग्रेसच्या शिस्तींत राहून सर्व करूं असा प्रदेश-कॉंग्रेसचा ठराव होता. लोकप्रतिनिधी या दृष्टीनें या प्रश्नाबाबतच्या लोकांच्या तीव्र भावना व स्वतःचेंहि मत व्यक्त करण्यासाठीं विरोधी बोलणें व विरोधी मत नोंदणें जरूर आहे असें त्यांना वाटत होतें. पण कॉंग्रेसच्या शिस्तीशीं हें कसें जमणार ? त्यांच्या २।३ बैठका होऊन या प्रश्नाचा खल झाला. विरोधी बोलण्यास व मत देण्यास परवानगी नसेल तर असेंब्लीसदस्यत्वाचा राजीनामा द्यावा, असा विचार जोरानें मूळ धरूं लागला. मुंबईतील डॉ. नरवणे व इतर काँग्रेसपक्षीय महाराष्ट्रीय सदस्यांनीं याबाबत जोरानें उठाव केला. भाऊसाहेब हिरे व इतर बऱ्याच सदस्यांनीं राजीनामा देण्याचें ठरविलें. ज्याच्या सदसद्विवेकबुद्धीस तसें वाटेल त्यानें राजीनामा द्यावा, दडपण कोणावर आणूं नये असें ठरलें. नोव्हेंबर २१ ची ॲसेंब्लीची बैठक सुरूं होण्यापूर्वी बऱ्याच जणांनीं राजीनामा देण्याचा निर्णय घेतला व त्या दिवशीं बैठक संपेपर्यंत ११८ पैकीं १०३ कॉंग्रेसपक्षीय










महाराष्ट्रीय सदस्यांनीं राजीनामे प्रत्यक्ष दिले होते किंवा देण्याच्या तयारींत होते असें म्हणतात. अर्थात् हे राजीनामे प्रदेश-काँग्रेस-कमिटीच्या प्रमुखामार्फत मध्यवर्ती पार्लमेंटरी बोर्डाकडे जाणार होते. ते सरळ स्पीकरकडे द्यावयाचे नव्हते. पण पुनः रात्रीं पक्षप्रमुख व महाराष्ट्रीय काँग्रेस-पुढारी यांमध्यें वाटाघाटीस सुरुवात झाली. विरोधी बोलण्यास हरकत नाहीं. पण विरोधी मत देतां येणार नाहीं एवढी सवलत पक्षप्रमुख द्यावयास तयार झाले. मुंबईतील वातावरण अत्यंत तप्त होतें. अशा परिस्थितींत ही सवलत घेऊन समाधान मानण्याची सदस्यांची तयारी दिसली नाहीं. सुरवातीच्या दिवशींच ही सवलत दिली असती तर एकवेळ ती घेतली गेली असती. अखेर वाटाघाटींतून असें निष्पन्न झालें कीं फेरविचार करण्याबद्दल महाराष्ट्र प्र. काँग्रेसनें ठराव केला आहे त्यास धरून वर्किंग कमिटी याचा फेरविचार करीपर्यंत पक्षप्रमुखानें कांहीं आदेश देऊं नये व ॲसेंब्लीतील चर्चा तहकूब करावी. काँग्रेसच्या अध्यक्षांशीं बोलणें होऊन हा निर्णय घेण्यांत आला. त्याप्रमाणें नोव्हेंबर २२ रोजीं ॲसेंब्ली व कौन्सिल या दोहोंच्या बैठका बेमुदत तहकूब करण्यांत आल्या. असेंब्लींत तहकुबीची सूचना श्री. भाऊसाहेब हिरे यांनीं मांडली. यावेळीं केलेल्या निवेदनांत आदल्या दिवशीं मुंबईत झालेल्या अत्याचारांचा त्यांनीं निषेध केला व शेवटीं, आपण काँग्रेसच्या शिस्तींत राहूं व वर्किंग कमिटीचा जो आदेश येईल त्याप्रमाणें वागूं असें जाहीर केलें.

ता. १७ नोव्हेंबरच्या महाराष्ट्र प्र. काँग्रेसच्या सभेंत मुंबईबाबतच्या निर्णयाचा वर्किंग कमिटीनें फेरविचार करण्यासंबंधींचा जो ठराव केला त्या वेळीं जरूर पडल्यास महाराष्ट्रातर्फे एकादें शिष्टमंडळहि काँग्रेस-वरिष्ठांना यासाठीं भेटण्यास जावें अशी एक सूचना आली होती. शिष्टमंडळ या स्वरूपांत नसलें, तरी त्या दृष्टीनें काँग्रेस-वरिष्ठांस भेटून त्यांच्याशीं पुनः बोलणीं करण्यासाठीं श्री. भाऊसाहेब हिरे व श्री. शंकरराव देव २९ नोव्हेंबरला दिल्लीस गेले. पार्लमेंटचें अधिवेशन यावेळीं सुरू होतेंच. त्यामुळें पार्लमेंटची महाराष्ट्रीय सदस्य-मंडळी व महाराष्ट्र काँग्रेसचे अध्यक्ष दिल्लींत होतेच. पं. पंत, पं. नेहरू, श्री. ढेबर यांना देव, हिरे प्रभृति मंडळी भेटली. मुंबईच्या गोळीबारासंबंधीं पार्लमेंटमध्यें विरोधी पक्षाकडून तहकुबीची सूचना आणली गेलीच होती. ता. १४ डिसेंबरपासून १० दिवस लोकसभेंत व राज्यसभेंत रा. पु. समितीच्या अहवालावर चर्चा सुरू होणार होती. पार्लमेंटमधील महाराष्ट्रीयेतर प्रमुख लोकप्रतिनिधींना व्यक्तिशः भेटून मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची बाजू त्यांना समजावून देण्याचा देव, हिरे, गाडगीळ प्रभृतींनीं प्रयत्न केला. सर्वांना संयुक्त-महाराष्ट्र-परिषदेच्या निवेदनाच्या पुस्तिका व इतर पत्रकें वाटण्यांत आलीं. रा. पु. समितीच्या अहवालावर टीका करणारी प्रा. ध. रा. गाडगीळ यांनीं लिहिलेली एक पुस्तिकाहि सर्वांना वाटण्यांत आली. प्रा. गाडगीळांच्या या पुस्तिकेंत समितीच्या सर्वसाधारण शिफारसींचें व विशेषतः तिच्या महाराष्ट्रासंबंधींच्या शिफारसींचें सडेतोड परीक्षण केलें असून या शिफारसीमुळें महाराष्ट्रीयांना 'हीन नागरिकत्वा'चा दर्जा कसा मिळत आहे हें विशद केलें आहे. मुंबईतील अल्पसंख्य जमातींच्या व औद्योगिक अगर व्यापारी हितसंबंधीयांच्या भीती त्यांच्याशी समक्ष वाटाघाटी करून जाणून घेण्याचा संयुक्त महाराष्ट्राच्या पुढाऱ्यांनीं कसा प्रयत्न केला हेंहि त्यांत दाखविलें आहे. याच अनुरोधानें मुंबई-शहराची विशिष्ट परिस्थिति लक्षांत घेऊन मुंबईशहराच्या स्थानिक कारभारांत स्वायत्ततेचे अधिकार जास्तींत जास्त प्रमाणांत देणें शक्य असून ते कसे व कोणते देतां येतील यासंबंधीं संयुक्त-महाराष्ट्र-परिषदेनें रा. पु. समितीला सादर केलेल्या निवेदनाच्या प्रतीहि पार्लमेंटच्या सदस्यांना वाटल्या. याच सुमारास मुंबई शहराबाबतची अशोक-हॅरिस यांची एक योजना लोकांत चर्चिली जात होती. ह्या योजनेंत नवीन असें कांहींच नव्हतें. सं. म. परिषदेनें सादर केलेली योजनाच अधिक स्पष्ट व तपशीलवार होती. पोलीस खातें कॉर्पोरेशनकडे असावें असें अशोक-हॅरिस योजनेंत होतें. सं. म. परिषदेच्या निवेदनांतहि यासंबंधानें विचार केला होता; तत्त्वतः त्यास विरोध नव्हता. पण मुंबई-शहराच्या कारभाराशीं संबंध असणाऱ्या तज्ज्ञ अधिकारी मंडळींच्या सल्ल्यानेंच, पोलीस खातें कॉर्पोरेशनकडे नसावें, असें सुचविलें होतें. पण ही अशोक-हॅरिस योजनाहि काँग्रेस-वरिष्ठांनीं विचारांत घेतली असें दिसून आलें नाहीं.

इकडे मुंबईत श्री. पाटलांनीं ता. २७ नोव्हेंबरला पुनः चौपाटीवर जाहीर सभा घेतली. बंदोबस्तासाठीं











हजारोंनीं पोलीस होते. तरी ५।१० मिनिटांतच सभेंत गोंधळास सुरवात झाली. विरोधी लोक सभा उधळ-ण्याचा प्रयत्न करीत होते. —पोलीसांनीं अनेक वेळीं अश्रूवायु सोडून गोंधळ करणाऱ्यांना पांगवण्याचा प्रयत्न केला. लाठीमारहि केला. गोंधळांतच अखेर सभा संपली. या सभेनंतर श्री. पाटील व मुंबई काँग्रेस-च्या पुढाऱ्यांनीं मुंबईच्या निरनिराळया मोहल्यांतून व गल्ल्यांतून सभा घेण्याचें ठरविलें. संपूर्ण महाराष्ट्रीय वस्तींत त्यांना सभा घेणेंच शक्य नव्हतें. मिश्र वस्तींत घेतलेल्या सभांतहि गोंधळ होऊन त्या उधळल्या जात. प्रत्येक ठिकाणीं पोलीस-बंदोबस्त मोठ्या प्रमाणांत असे. संयुक्तमहाराष्ट्रवादी काँग्रेसेतर पक्षांनीं आपली कृति-समिति नेमून मुंबई शहरांत जोरानें प्रचारास सुरवात केली. त्यांच्या मोठमोठ्या सभा होऊन लाखांच्या संख्येनें लोक उपस्थित रहात व शांततेनें पार पडत. श्री. शंकरराव देवांच्या धोरणाबाबत व महाराष्ट्र काँग्रेस-च्या धोरणाबाबत डावे गट जाहीरपणें नापसंती व विरोध व्यक्त करूं लागले. श्री. शंकरराव देवांच्या संयुक्तमहाराष्ट्रविषयक पुढारीपणाबाबत मुंबईतील जन-तेच्या मनानें पूर्वी घेतलेली पकड ढिली होत असल्या-चें दिसून येऊं लागलें. संयुक्तपरिषदेचे ते सर्वाधिकारी असल्यानें लोक त्यांच्याकडे अपेक्षेनें पहात. काँग्रेस-विरहित निवळ डाव्या गटाच्या लोकांना बरोबर घेऊन संयुक्त महाराष्ट्र मिळविण्यासाठीं प्रत्यक्ष कांहीं कृतीचा कार्यक्रम आंखणें श्री शंकरराव देवांना शक्यच नव्हतें. मुंबई शहरांत संयुक्त महाराष्ट्रवादी काँग्रेसजनांचा गट डॉ. नरवणे, घारपुरे यांचे नेतृत्वाखालीं जोरानें वाढत होता. पण या लोकांना डाव्या गटांशीं सहकार्य करून कांहीं कार्यक्रम आंखणें शक्य नव्हतें. काँग्रेसजन राहूनच आपलें बल वाढविण्याचा ते प्रयत्न करीत. संयुक्त महा-राष्ट्राबाबतचें त्यांच कार्य स्वतंत्रपणें चाले. तथापि कोण-त्याही संयुक्त-महाराष्ट्रविषयक कार्यांत संयुक्त महाराष्ट्र-वाद्यांत आपापसांत विरोध निर्माण होणार नाहीं इकडे दोन्हीहि पक्ष लक्ष देत.

## मुंबई कार्पोरेशनचा ठराव

याच सुमारास मुंबई कार्पोरेशनमध्यें समाजवादी पक्षातर्फे प्रा. राम जोशी यांनीं मांडलेला मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रास पाठिंबा देणारा ठराव चर्चेस निघाला होता. संयुक्त महाराष्ट्रवादी काँग्रेसपक्षीय सदस्यांनीं पाठिंबा दिल्यास हा ठराव कार्पोरेशनमध्यें बहुमतानें मंजूर होईल असें दिसून येऊं लागलें. मुंबई-शहरांतील लोकमत मुंबई महाराष्ट्रांत सामील करण्याच्या विरुद्ध आहे असें श्री. स. का. पाटील व इतर विरोधक नेहमीं म्हणत. त्यास उत्तर देण्यास व मुंबईचें मत मुंबई महा-राष्ट्रांत विलीन करण्यास अनुकूल असल्याचें दाखवि-ण्यास हाच लोकशाही मार्ग होता. संयुक्त महाराष्ट्रवादी काँग्रेसजनांच्या गटानें कार्पोरेशनमधील काँग्रेसपक्ष-प्रमुखाकडून शिस्तीचें कांहीं बंधन आल्यास, तें झुगा-रूनहि या ठरावास पाठिंबा देण्याचें ठरविलें. राजीनामा देण्याचा प्रसंग आल्यास त्याचीहि तयारी ठेवून ह्या मडळींनीं कंबरा कसल्या. म्युनिसिपल काँग्रेसपक्षांत या प्रश्नावर खंबीर अशी प्रथम ७।८ मंडळीच होती. पण ही संख्या हळूंहळूं वाढत गेली. महाशब्दे, पुप्पाला, आचरेकर वगैरे मंडळींनीं पुढाकार घेऊन जोरानें खट-पट सुरूं केली. श्री. महाशब्दे यांनीं मुंबईसह संयुक्त महाराष्ट्रास पाठिंबा देणारें अत्यंत प्रभावी भाषण कार्पो-रेशनमध्यें या ठरावावर केलें. अनेक दिवस व कित्येक तास या ठरावावर चर्चा झाली. हा ठराव मंजूर होणार व आपला पराभव होणार या भीतीनें श्री. पाटील निर-निराळीं कारस्थानें करून मतदान पुढें ढकलण्याचा प्रयत्न करीत होते. वार्डावार्डांतून मतदारांच्या सभा होऊं लागल्या व आपल्या प्रतिनिधीने मुंबईसह संयुक्त महारा-ष्ट्राच्या बाजूनें मत दिलें पाहिजे असा मतदार आदेश देऊं लागले. या लोकमताचा काँग्रेसपक्षीय सदस्यांवर परिणाम होऊन कार्पोरेशनमधील संयुक्त महाराष्ट्रवादी काँग्रेसपक्षीयाची संख्या वाढूं लागली. अखेर ता. २२ डिसेंबरला या ठरावावर मतदान होऊन ६३ विरुद्ध शून्य मतांनीं हा ठराव पास झाला. ठरावास विरोध करणाऱ्या काँग्रेसपक्षीयांनीं कांहींतरी निमित्त करून सभात्याग केला. संयुक्त महाराष्ट्रवादी २३ काँग्रेसपक्षीयांनीं ठरावाच्या बाजूनें मतें दिलीं. सर्व समाजवादी व इतर डाव्या व स्वतंत्र पक्षाच्या सभासदांनींहि ठरावाच्या बाजूनें मतें दिलीं. या मतदानानें मुंबईचें लोकमत महाराष्ट्रांत मुंबई सामील करण्याच्या विरुद्ध आहे हा विरोधकांचा दावा खोटा ठरला. मुंबईच्या लोकमताचा कौल म्हणजेच कॉर्पोरेशनचें यासंबंधींचें मत मुंबई स्वतंत्र असावी असेंच येईल अशी कांहीं दिवसापूर्वींच श्री. पाटील








यांनीं चढाई मारली होती. एवढेंच नव्हे तर त्यांनीं मुंबई प्र. काँग्रेसच्या ठरावांतहि तसा उल्लेख केला होता.

### काँग्रेसमधील मतभेद चव्हाट्यावर आले

दिल्लीस देव-हिरे प्रभृति मंडळींच्या काँग्रेस-वरिष्ठांशीं वाटाघाटी चालू असतां उत्तर सातारा जिल्ह्यांत फलटण येथें जि. काँग्रेस-कमिटीची सभा झाली. त्यांत कांहीं मंत्र्यांनीं भाषणें केलीं. ती महाराष्ट्रांत बरीच गाजली. महाराष्ट्र काँग्रेसमध्यें जे दोन स्वतंत्र मतप्रवाह होते म्हणून वर उल्लेख आला आहे त्यांपकीं दुसऱ्या विचाराच्या मंडळींचा हा गट होता. एकाद्या ठरावानें महाराष्ट्र काँग्रेसनें श्री. शंकरराव देवांचें अधिकृत पुढारीपण स्वीकारलेंच नव्हतें. त्यांचें पुढारीपण नैतिक स्वरूपाचें होतें. त्यांचें पुढारीपण यापुढें आपणांस नको, काँग्रेस–संघटनेच्या दृष्टीनें तें हानिकारक होय असें या मंडळींना वाटलें. जे विचार अनेक दिवस महाराष्ट्रांतील कांहीं काँग्रेसजनांच्या अगर पुढाऱ्यांच्याहि मनांत म्हणतां येईल, सुप्तरीतीनें वावरत होते ते या सभेंत उघड प्रगट झाले इतकेंच. पण दिल्लीस श्री. शंकरराव वाटाघाटीस गेले असतां हें मतप्रदर्शन अनिष्ट होतें. अर्थात् त्यामुळें तेथील वाटाघाटीचें कार्य बिघडलें असें म्हणण्यास फारशी जागा नाहीं. हे मतभेद जाहीर रीतीनें चव्हाट्यावर आल्यामुळें काँग्रेसवर विसंबून रहाणाऱ्या सर्वसामान्य जनतेंत एक तऱ्हेची निराशा व चीडहि फैलावली. काँग्रेसविरोधी-पक्षांना याकडे बोट दाखवून मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र साध्य करण्याच्या दृष्टीनें महाराष्ट्र काँग्रेस असमर्थ आहे, अशी टीका करण्यास चांगली संधि मिळाली.

### लोकसभेंतील चर्चा

लोकसभेंतील व राज्यसभेंतील रा. पु. समितीच्या शिफारसीवरील चर्चेंत मुंबईसह संयुक्तमहाराष्ट्राची बाजू प्रतिनिधींनीं बरीचशी समाधानकारक मांडली. त्यांपैकीं लोकसभेंत श्री. काकासाहेब गाडगीळ व राज्यसभेंत श्री. देवगिरीकर महाराष्ट्रातर्फेंचे प्रमुख वक्ते होते. मराठवाड्यातर्फे स्वामी रामानंदतीर्थ व विदर्भांतून डॉ. खेडकर बोलले. विरोधी पक्षांपैकीं महाराष्ट्रांतील श्री. शंकरराव मोरे बोलले. त्यांनीं आपल्या भाषणांत सर्वपक्षीय गोलमेज परिषदेची सूचना केली. म. म. काणे, आळतेकर, देशपांडे, देवकीनंदन वगैरेंनींहि चर्चेंत भाग घेतला. इतर प्रांतांतील बऱ्याच वक्त्यांनीं मुंबईसह संयुक्तमहाराष्ट्राच्या मागणीस पाठिंबा देऊन त्याची न्याय्यता मान्य केली. विरोधीपक्षीय बहुतेक वक्त्यांनीं पाठिंबाच दिला. पण पाठिंबा देणाऱ्यांत कांहीं काँग्रेसपक्षीय महाराष्ट्रीयेतर सदस्यहि होते. पं. नेहरू व पं. पंत यांचींहि भाषणें झाली. पं. नेहरूंनीं या प्रश्नाबाबत त्यांचीं नेहमींचींच मतें मांडलीं. नवीन म्हणजे विभागीय मंडळां-( झोनल कौन्सिल )ची एक कल्पना मांडली व बहुतेक सभागृहाचा तिला पाठिंबा दिसून आला. पं. नेहरू व पंत या दोघांनींहि आपणांस व्यक्तिशः रा. पु. समितीनें शिफारसलेली मुंबई राज्याची योजनाच पसंत आहे, असें आपलें मत सांगितलें. पण कोणतीहि योजना कोणाच्याहि गळीं बळजबरीनें घालण्याची आमची इच्छा नाहीं असे ते म्हणाले. रा. पु. समितीच्या अहवालांत महाराष्ट्रीयांची मनें दुखविलीं जातील अशी कांहीं वाक्यें आल्याबद्दल पं. पंतांनीं खेद व्यक्त केला व तीं न येतीं तर बरें झालें असतें असें ते म्हणाले. पं. पंतांनीं महाराष्ट्रीयांच्या पूर्वेतिहासाचा व राष्ट्रीय सेवेचा गौरवानें उल्लेख केला. त्याचप्रमाणें गुजरातबद्दलहि गौरवाचे उद्गार काढले. या संबंधांत बोलतांना, टिळक, गांधीं इत्यादि श्रेष्ठ व्यक्तींचा त्यांनीं नामोच्चार केला. शेवटीं शंकरराव, देव, काकासाहेब गाडगीळ व मुरारजी देसाई यांचेबद्दल गौरवोद्गार काढून तिघांनाहि हा प्रश्न समाधानकारकरीतीनें सोडविण्याबद्दल आवाहन करून सर्वांना संमत होईल असा कांहीं मार्ग काढण्याचा त्यांनीं निश्चय प्रगट केला. त्रिराज्य-योजना आम्ही मान्य करूं अशी महाराष्ट्राच्या पुढाऱ्यांनीं आमची समजूत करून दिली होती असेंहि पं. नेहरूंच्या भाषणांत आलें. प्रथम मान्य होइल म्हणून म्हणतात मागाहून तेंच अमान्य करतात, एक-जण एक बोलतो तर दुसरा दुसरेंच कांहीं सुचवितो असें काँग्रेस वरिष्ठांचें मत महाराष्ट्रीय पुढाऱ्यांबद्दल झालें असावें असें कित्येक घटनांवरून वाटतें. काँग्रेस-वरिष्ठांना शंकरराव देव वेगळे भेटत, देवगिरीकर वेगळे भेटत, भाऊसाहेब हिरे कधीं कोणाबरोबर तर कधीं एकटेच भेटत, श्री. पाटसकर व इतर महाराष्ट्रीय खासदार मंडळीहि वेगळी भेटत व आपापल्यापरीनें कांहीं सांगत. सुचवावयाच्या पर्यायाबद्दल अगर








धोरणाबद्दल सर्वांनीं एकत्र बसून आधीं कांहीं निश्चित निर्णय घेतला असल्यास अशा रीतीनें भेटण्यांत कांहींच नुकसान नाहीं. पण तसें कांहीं घडत असे कीं नाहीं हें कळण्यास मार्ग नाहीं. महाराष्ट्रीय पुढारीपण प्रथम दुबळें आणि त्यांतहि पुनः एकवाक्यता नसल्यामुळें बाहेर त्याबद्दल हंसें झाल्यास नवल काय ?

## डॉ. नरवणे यांचा बाणेदारपणा

ता. २३ व २४ डिसेंबरला दिल्लीस कॉंग्रेस वर्किंग-कमिटीची सभा झाली. पण तीमध्यें राज्यपुनर्रचनेच्या कोणत्याहि वादग्रस्त प्रश्नाबद्दल निर्णय घेण्यांत आला नाहीं. हें निर्णय देण्याचें काम पं. नेहरू, पं. पंत, मौ. आझाद व श्री. ढेबर या चौघांच्या उपसमितीकडे सोंपविण्यांत आलें. या बैठकीच्या आदल्या दिवशींच मुंबईस कॉर्पोरेशनमध्यें मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचा ठराव मंजूर झाला होता. पण या बैठकींत त्याची फारशी दखल घेण्यांत आली नाहीं. धाकदपटशा दाखवून व अत्यंत भीतिग्रस्त वातावरणांत हा ठराव मंजूर करून घेण्यांत आला आहे असें निवेदन श्री. पाटील यांनीं तेथें केलें. पण लगेच श्री. देवगिरीकर यांनीं तें खोडून काढून ज्या कॉंग्रेसपक्षीयांनीं ठरावास अनुकूल मतें दिलीं त्यांनीं आपण तीं स्वखुषीनें दिलीं असल्याबद्दलचें काढलेलें पत्रक कमिटीच्या निदर्शनास आणलें.

इकडे मुंबईंत डॉ. नरवणे यांचेकडून मुख्य मंत्री श्री. मोरारजीभाई देसाई यांनीं ता. २६ डिसेंबर रोजीं त्यांच्या उपमंत्रिपदाचा राजीनामा मागितला. ‘ चोविस तासांत राजीनामा दिला नाहीं तर मी तुम्हांस काढून टाकीन ’ असेंहि त्यांनीं कळविलें. ज्याची परिणति अत्याचारांत होते अशा हालचाली तुम्ही करतां, त्यामुळें तुम्ही माझा विश्वास गमावला आहे असा आरोप करून हा राजीनामा मागण्यांत आला. डॉ. नरवणे यांनीं मुख्य मंत्र्यांनीं केलेल्या आरोपाचा खोटेपणा दाखवून बाणेदारपणानें ता. २७ रोजीं उपमंत्रिपदाचा राजीनामा दिला. याबाबत त्या दोघांचा झालेला पत्रव्यवहारहि त्यांनीं प्रसिद्धीस दिला. कॉर्पोरेशनमध्यें मंजूर झालेल्या मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या ठरावाची ही सरकारी प्रतिक्रिया होय असाच जनतेनें त्याचा अर्थ केला व डॉ. नरवणे यांचें जनतेंतील स्थान पूर्वीपेक्षांहि उंच झालें. मुंबई कॉंग्रेसमधील संयुक्त महाराष्ट्रवादी गटाचे डॉ. नरवणे हे पुढारी होते व दिवसेंदिवस या गटाचें सामर्थ्य वाढत होतें. आतां त्यांच्या राजीनाम्यामुळें तर तें अधिकच झपाट्यानें वाढूं लागलें. या गटानें आपलें काम पद्धतशीरपणें सुरू केलें. या गटानें आपली सभासद-नोंदणी सुरू केली व थोड्याच अवधींत सभासद-संख्या ५०|६० हजारापर्यंत गेली. मुंबईंत प्रचंड सभा होऊन डॉ. नरवणे यांचा गौरव होऊं लागला व संयुक्त महाराष्ट्राचा प्रचार वाढूं लागला. पण खेदाची गोष्ट म्हणजे डॉ. नरवणे यांना या पद्धतीनें मंत्रिपदाचा राजीनामा द्यावा लागल्याबद्दल मुंबई मंत्रि-मंडळांतील एकाहि महाराष्ट्रीय मंत्र्यानें बाहेर अगर मंत्रिमंडळाच्या बैठकींत याबद्दल विरोध प्रदर्शित केला नाहीं कीं जाब विचार विचारला नाहीं ! मुंबई मंत्रि-मंडळाचें कार्य सामुदायिक जबाबदारीनें चालत नाहीं असाच याचा अर्थ केला गेला. पण लोकांना आश्चर्य वाटलें तें महाराष्ट्रीय मंत्री हें निमूटपणें सहन करून मंत्रिमंडळांत रहातात याबद्दलचें !

## पुन्हां मोठ्या द्विभाषिक राज्याचा पर्याय !

डिसेंबर–अखेर श्री. शंकरराव देव दिल्लीहून मुंबईस परत आले ते लगेच लोकसभेंत पंडित पंतांनीं केलेल्या आवाहनाचा धागा घेऊन श्री. मुरारजीभाई देसाई यांच्याशी वाटाघाटी करून सर्वसंमत असा कांहीं मार्ग निघतो का, या प्रयत्नास लागले. दिल्ली सोडतांना पंतजींना भेटून त्यांच्या सल्ल्यानेंच त्यांनीं या हालचाली सुरू केल्या. ता. २८ डिसेंबरला ते मुरारजीभाईंना भेटले. एकदोन तास बोलणीं झालीं. पण त्या दिवशींच्या भेटींतून कांहींच निष्पन्न झालें नाहीं. ता. २९ रोजीं पंडित नेहरू दक्षिणेंतून येतांना वाटेंत मुंबईंत कांहीं तास थांबले. त्यांचीं व मुरारजीभाईंचीं बोलणीं झालीं असावीं व मुंबईचा प्रश्नहि चर्चिला गेला असावा. कारण ता. ३० रोजीं श्री. शंकरराव मुरारजीभाईंना पुनः भेटण्यास गेले त्यावेळीं मुरारजीभाईंचा पवित्रा बदललेला दिसला. कदाचित् सर्वसंमत अशी तडजोड काढण्याबद्दल पं. नेहरूंनीं सांगितलें असावें. मुरारजीभाईंना व्यक्तिशः रा. पु. समितीचें द्विभाषिक राज्य पसंत होतें, एवढेंच नव्हे तर ती त्यांनीं सुचविलेलीच योजना होती असें म्हटलें तरी चालेल. पण ती महाराष्ट्राला पसंत नव्हती. वर्किंग कमिटीची त्रिराज्य-योजनाहि महाराष्ट्राला पसंत










नव्हती. मुंबई शहर कोणत्याहि रीतीनें म्हणजे कॉर्पोरेशनला जादा अधिकार देऊन व अल्पसंख्याकांच्या हितरक्षणाची तरतूद करूनहि तें महाराष्ट्रांत घालवयास मुरारजीभाई तयार नव्हते. गुजरात कॉंग्रेसचें हेंच मत. मग मागें महाराष्ट्र प्र. कॉंग्रेसनें सुचविलेला सर्व मराठी – गुजराती – भाषिकांच्या द्विभाषिक राज्याचा पर्याय राहिला. पहिल्या भेटींत मुरारजीभाईंनीं त्यास संमति दर्शविली नव्हती. पण पं. नेहरूं भेटून गेल्यानंतर दुसऱ्या दिवशीं आपण व्यक्तिशः ती स्वीकारण्यास तयार असल्याचें त्यांनीं सांगितलें. पण गुजरात-कॉंग्रेसच्या लोकांशीं तुम्ही परस्पर बोला म्हणून सांगितलें व लगेच गुजरात प्र. कॉंग्रेसचे चिटणीस व दुसरे एक गुर्जर पुढारी यांना तेथें बोलावलें. त्या मंडळींनीं सांगितलें कीं गुजरातचा त्यास विरोध होईल पण कॉंग्रेस वर्किंग कमिटीकडून ती आल्यास आम्ही स्वीकारूं. अर्थात् असें द्विभाषिक राज्य झाल्यास त्यांत गुजराती लोकांना कोणते संरक्षक हक्क असावेत हें वाटाघाटीनें ठरवावें असें ते म्हणाले. खुद्द मुरारजीभाई कोणतेहि संरक्षण हक्क देण्याची गरज नाहीं या मताचे होते. असें द्विभाषिक राज्य बनल्यास तें चालविण्याची मुख्य जबाबदारी श्री. मुरारजीभाईनींच घ्यावी असें श्री. देवांनीं त्यांना आवाहन केलें होतें. गेल्या कांहीं महिन्यांतील घटना पाहतां हें द्विभाषिक राज्य कार्यक्षमरीतीनें कसें चालेल याची गुजराती पुढाऱ्यांना तेवढी खात्री वाटत नव्हती. म्हणून महाराष्ट्राच्या बाजूनें तुम्ही सरकारची जबाबदारी जरूर पडल्यास उचलली पाहिजे असेंहि ते शंकररावांना म्हणाले. पण मुरारजीभाई शेवटीं म्हणाले कीं 'महाराष्ट्राच्या लोकांना ही द्विभाषिक-राज्ययोजना आतां पसंत पडेल कीं नाहीं हें सांगता येत नाहीं. तेव्हां त्याबाबत तुम्ही आधीं निश्चित सांगा. मग गुजरातचा प्रश्न.' शंकरराव हर्षभरानें परतले व मुंबईंत असणाऱ्या महाराष्ट्रीय कॉंग्रेस पुढाऱ्यांच्या कानीं त्यांनीं हें वृत्त घातलें. पण त्या मंडळींची मनें आतां द्विभाषिक राज्य स्वीकारावयास तयार नसल्यानें त्यांना शंकररावांप्रमाणें आनंद झाला नाहीं. त्याच रात्रीं म्हणजे ता. ३० डिसें. ला पं. पंतांच्या कानीं ही हकीगत घालण्यास शंकरराव विमानानें दिल्लीस गेले व लगेच ३१ डिसें. ला परतले. नंतर यासंबंधीं निश्चित निर्णय घेण्यासाठीं श्री. देवगिरीकर यांनीं महाराष्ट्र, मुंबई, मराठवाडा व विदर्भ यांतील कांग्रेसपक्षीय पुढारी-मंडळींना ता. २ जानेवारीस मुंबईस बोलावलें. महाराष्ट्र प्र. कॉंग्रेसनें विदर्भासह द्विभाषिक राज्याचा ठरावच केला असल्यानें ती भूमिका आतां उघडपणें सोडणें कठिण होतें. परंतु त्यावेळेपेक्षां आतां परिस्थिति फारच बदलली होती. मुंबईतील ताज्या घटनांनीं संयुक्तमहाराष्ट्रवाद्यांचें बळ वाढत होतें. सरकारनें त्रिराज्ययोजना लादली तरी पुढें लोकमताच्या जोरावर मुंबई महाराष्ट्रांत विलीन करून घेतां येईल असा विश्वास त्यांना वाटूं लागला होता. मुंबई-प्रदेश-कॉं.-कमिटीशीं भांडण करून मुंबईतील संयुक्तमहाराष्ट्रवादी कॉंग्रेसजनांनीं हें बल वाढविलें होतें. अशा परिस्थितींत पुनः द्विभाषिक राज्य म्हणजे केलेलें सर्व वाया जाणार ! शिवाय हें द्विभाषिक राज्यहि कायम टिकेल ही खात्री नाहीं. विदर्भाकडील मंडळींचा तर कोणत्याहि परिस्थितींत द्विभाषिक राज्याला विरोध होता. महाराष्ट्र प्र. कॉंग्रेसनें मागें हा ठराव मंजूर केला त्यावेळींहि त्यांनीं आपला विरोध प्रदर्शित केला होता. आणि आतां परिस्थिति बदलल्यामुळें खुद्द महाराष्ट्रांतील व मुंबईतील पुढारी-मंडळीहि पुनः द्विभाषिकावर जाण्यास तयार नव्हती. मूलतः या मंडळींनीं पूर्वीं या ठरावास पाठिंबा दिला होता तो एक डाव म्हणून व तात्पुरती योजना म्हणूनच. तात्त्विकदृष्ट्या व कायमची अशी ही योजना कोणासच पसंत नव्हती. अखेर बरीच वाटाघाट होऊन पूर्वीं ठराव केला असला तरी हें द्विभाषिक राज्य आतां आम्हांस मान्य नाहीं असें शंकररावांनीं सांगावें असें ठरलें. श्री. शंकररावांना अत्यंत वाईट वाटलें. पण ही चर्चा चालू असतांना जनमताची त्याबद्दलची उठलेली प्रतिक्रिया पाहतां ती या योजनेच्या पूर्णपणें विरोधी होती. या हालचालीमुळें श्री. शंकरराव देव लोकांच्या मनांतून आणखी खालीं उतरले. ज्या तात्त्विक भूमिकेवरून त्यांनीं याचा पूर्वी प्रचार केला त्यावेळीं प्रत्यक्षांत असें कांहीं घडेल असें न वाटल्यामुळें त्याचा कोणीच गंभीरपणें विचार केला नव्हता. संयुक्तमहाराष्ट्र-निर्मितींतील एक मधली पायरी व एक डाव हीच बहुतेकांची भूमिका होती. आतां मुंबईतील लोकमताच्या जोरावर मुंबई महाराष्ट्रांत विलीन करतां येईल हा विश्वास वाटूं लागला होता. आणि त्यांतच ज्या मुरारजीभाईंबद्दल त्यांच्या अलीकडील दडपशाही धोरणामुळें महाराष्ट्रीयांचें मत कटु झालें होतें ते मुरारजीभाईच या द्विभाषिक राज्याचे








पुनः मुख्य मंत्री राहतील ही सूचना शंकररावांनीं केल्यामुळें लोकांमध्यें त्याची प्रतिक्रिया फारच वाईट झाली. मुंबईंतील अनेक अल्पसंख्य जमातींच्या पुढाऱ्यांनींहि शंकररावांच्या या सूचनेबद्दल नापसंती व्यक्त केली. तिकडे गुजरातमध्येंहि या द्विभाषिक राज्याच्या कल्पनेस जोराचा विरोध होऊं लागला. महागुजरात – समितीच्या लोकांनीं व इतर गुर्जर पुढाऱ्यांनीं त्याविरुद्ध पत्रकें काढलीं. श्री. शंकरराव देव मोठ्या खिन्न अंतःकरणानें मुरारजीभाईंना महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचें मत कळवावयास गेले. गुजरातचा विरोध होईल, ही मुरारजीभाईंना जाणीव होतीच. 'दोघांसहि पसंत नाहीं मग त्या मार्गानें जाण्यांत काय अर्थ' असें ते म्हणाले. पण महाराष्ट्रीयांनीं पसंत केलें असतें तर गुजरातच्या गळीं मी तें उतरविण्याचा प्रयत्न केला असता असेंहि अखेर ते म्हणालेच. या वाटाघाटींची ही फलश्रुति पंतजींना शंकररावजींनी दिल्लीस पत्रानें कळविली. व व्यथित अंतःकरणानें ते पुण्यास परत गेले.

मुंबईचें वेगळें शहरराज्य होऊं नये असें मुंबईंतील कांहीं प्रमुख महाराष्ट्रीयेतर उद्योगपतींना व अर्थशास्त्र-ज्ञांनाहि वाटत होतें. डॉ. जॉन मथाई यांनीं एक पत्रक काढून आपलें असें मत जाहीर केलें होतें. श्री. तुळसीदास किलाचंद यांनीं आपल्या लोकसभेंतील भाषणांत हें मत व्यक्त केलें होतें. कांहींनीं हें आपलें मत खाजगी रीत्या बोलून दाखविलें होतें. रा. पु. समितीचें द्विभाषिक राज्य महाराष्ट्रीयांना मान्य नसल्यास विदर्भासह मोठें द्विभाषिक राज्य करण्यास या मंडळींनीं पाठिंबा दिला होता. मुंबई प्र. कॉंग्रेसचे प्रमुख श्री. पाटीलहि या मोठ्या द्विभाषिक राज्यास मागें त्यांनीं विरोध केला असला तरी आतां तें स्वीकारण्यास तयार झाले होते. पण महाराष्ट्र व गुजरात या दोन्हींमधील एकंदर लोकमत या मोठ्या द्विभाषिक राज्याच्या पूर्णपणें विरुद्ध असल्याचें दिसून आलें. हें मोठें द्विभाषिक राज्यहि बनविणें शक्य नसल्यास मुंबई महाराष्ट्रांत घालावी असें आपलें मत डॉ. मथाई यांनीं व्यक्त केलें होतें. शंकररावजी कांहीं उद्योगपतींना भेटले होते व हें विदर्भासह द्विभाषिक राज्य स्वीकारण्यासाठीं त्यांचीं मनें वळविण्यांत त्यांना थोडेंफार यशहि लाभलें होतें. ही आपली योजना आतां आपल्याच लोकांनीं बाजूस सारल्यामुळें त्यांना दुःख होणें स्वाभाविक होतें.

## मुंबई शहर तात्पुरतें केंद्रशासित ठेवण्यास मान्यता

कॉंग्रेस–वरिष्ठांची उपसमिति याबाबत अखेरचा काय निर्णय देते इकडे आतां लोकांचें लक्ष होतें. मध्यंतरीं ता. १२ जानेवारीस पुन्हां एकदां देव, हिरे, गाडगीळ, देवगिरीकर ही मंडळी दिल्लीस शिष्टाईसाठीं म्हणून गेली पण तेथें फारसें कोणास न भेटतांच परत आली. कांहीं गैरसमजामुळें ही गोष्ट घडली. याची थोडी पार्श्वभूमि अशी : त्रिराज्य-योजना म्हणजे मुंबईशहराचें वेगळें राज्य संमत नाहीं असा ठराव केलेला व त्यासाठीं मुंबईत प्रक्षोभ व दंगलहि झालेली; विदर्भासहित मोठ्या द्विभाषिक राज्याची योजनाहि आतां मागें पडलेली. – या परिस्थितींत मुंबईशहर एकदम आतांच महाराष्ट्रांत घालण्यास कॉंग्रेस–वरिष्ठांना कांहीं अडचणी वाटत असल्यास मुंबईचें आज वेगळें राज्य न करतां कांहीं काल मुंबई केंद्रशासित ठेवावी व पुढें योग्य वेळीं योग्य त्या रीतीनें ती महाराष्ट्रांत सामील करावी अशी सूचना श्री. शंकरराव देव प्रभृति महाराष्ट्रीय पुढारी-मंडळींनी कॉंग्रेस - वरिष्ठांना केली होती. असें झाल्यास ही योजना महाराष्ट्रास मान्य होईल असें त्यांनीं सांगितलें होतें. सामील करण्याची वेळ व पद्धत मात्र निश्चितपणें सांगितली जावी व केंद्रशासित ही तात्पुरती व्यवस्था असावी. पण 'अशा रीतीनें पुढचें भविष्य स्पष्ट सांगून मुंबई वेगळी मग ती केंद्रशासित का होईना ठेवण्यांत काय अर्थ ? मुंबईचें असें अधांतरीं राज्य ठेवण्यानें तेथील परिस्थिति नेहमी अशांत व अनिश्चित रहाणार' असें दुसऱ्या बाजूचें म्हणणें. कोणताहि निकाल कायमचा हवा. तात्पुरत्या निकालानें पुढें गोंधळाची परिस्थितिच तेथें सतत रहाणार. 'या अडचणीमुळें काग्रेसवरिष्ठ विलीनीकरणाची वेळ व पद्धत आज सांगण्यास तयार नसल्यास नाइलाज म्हणून आज त्रिराज्य पत्करावें व पुढें मुंबईराज्यांत विलिनीकरणास बहुमत मिळवून तें राज्य घटनेंतील तरतुदीनुसार महाराष्ट्रांत विलीन करून घ्यावें. म्हणजे मुंबई कायमची केंद्रशासित करून घेण्यापेक्षां त्रिराज्य-योजना बरी. घटनेप्रमाणें व लोक-शाही मार्गानें पुढें आपलें साध्य गांठतां येईल, असें कांहीं महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचें मत होतें. असें कळतें कीं कॉंग्रेसवरिष्ठांनीं याबाबत श्री. चिंतामणराव देशमुखांना










अनुक्रमणिका

विचारलें असतां त्यांनीं सांगितलें कीं 'केंद्रशासित मुंबई केव्हां महाराष्ट्रांत सामील करावयाची हें निश्चित सांगणार नसल्यास मुंबईशहराचें सरळ वेगळें राज्य बनवावें, ती केंद्रशासित ठेवूं नये, महाराष्ट्र अखेर हें मान्य करील.' त्यावर कॉंग्रेसवरिष्ठ म्हणाल्याचें कळतें कीं "तुमचे कांहीं पुढारी म्हणतात 'केंद्रशासित ठेवा' तर तुम्ही वेगळें राज्य करा म्हणतां– कोणाचें मानावें ?" त्यावर त्यांनीं असा खुलासा केल्याचें कळतें केंद्रशासित ही तात्पुरती व्यवस्था असें धरूनच ही सूचना केली गेली होती. श्री. देशमुखांनीं ही हकिगत मुंबईस कळविली होती. कॉंग्रेसवरिष्ठांनीं महाराष्ट्रीय पुढाऱ्यांस पुनः बोलावलें नव्हतें. पण तशी समज करून ही मंडळी गेली व त्यांनीं जाण्यापूर्वीं मुंबईंत कित्येक तास आपसांत खल करून अमुक योजना अमुक क्रमानें मांडावी असें कांहीं ठरविलें होतें. पण तें मांडण्याची वेळच आली नाहीं. कॉंग्रेस–वरिष्ठांनीं काय निकाल द्यावयाचा तें आधींच ठरवून टाकलें होतें. अर्थात् तें अजून जाहीर झालें नव्हतें.

## सरकारी निर्णय

अखेर मुंबईशहर केंद्रशासित करण्याचें ठरविणारा तो दुर्दैवी निर्णय ता. १६ जानेवारी १९५६ ला रात्रीं रेडियोवर पं. नेहरूंच्या मुखानें जाहीर झाला. या निर्णयाची केवढी भीषण प्रतिक्रिया होईल याचा कांहीं अंदाज पुढारी करूं शकले नाहींत का ? पोलीस बंदोबस्त करण्यास वेळ मिळावा एवढ्यासाठींच निर्णय अधिकृत-रीत्या लवकर जाहीर केला नाहीं असें म्हणतात. लोकांनीं पुढाऱ्यांवर विश्वास ठेवून जे अंदाज बांधले ते जर चुकले तर मग पुढाऱ्यांचेहि लोकांबद्दलचे अंदाज चुकले हें स्वाभाविकच म्हणावें लागेल. राज्यपुनर्रचने-च्या प्रश्नाबाबत सरकारनें प्रसिद्धीचें एक पद्धतशीर धोरण आंखलेलें दिसलें. निर्णय अधिकृतपणें जाहीर करण्यापूर्वीं तो अनधिकृतपणें अगोदर कांहीं दिवस प्रसिद्धिला गेल्यास त्याची प्रति-क्रिया तेवढी कमी होते असें सरकारचें मत असावें. पण निर्णय पसंत नसणाऱ्यांना त्याविरुद्ध कांहीं क्रियेची तयारी करण्यासहि त्यामुळें अवधि मिळतो. ता. १६ पूर्वीं ४।५ दिवस अगोदरच हा निर्णय वृत्तपत्रांतून बाहेर फुटला होता. ता. १६ नंतर त्यास अधिकृततेचें शिक्कामोर्तब झालें इतकेंच. पण यावेळचा निर्णय केवळ कॉंग्रेस-वर्किंग-कमिटीचा नसून सरकारनें रा. पु. समितीच्या शिफारसीबाबत घेतलेला निर्णय असें त्याचें स्वरूप होतें. या निर्णयाच्या आधारावरच पार्लमेंटमध्यें यावयाचें राज्यपुनर्रचनाविषयक बिल तयार होणार होतें व तेंच बिल संबंधित राज्याकडे त्यांचें मत अजमावावयास जावयाचें होतें. या निर्णया-नुसार विदर्भाचा प्रश्न आतां अनिर्णीत न राहतां विदर्भ संयुक्तमहाराष्ट्रांत कायमचा आला. बृहन्मुंबई व मुंबई प्रदेश-कॉंग्रेस कमिटीच्या कक्षेंत येणारीं ठाणें जिल्ह्यांतील गावें मिळून मुंबईचा वेगळा राज्यघटक केला. पण त्यास राज्याचा दर्जा न देतां तें केंद्रशासित ठेवलें. बाकी महाराष्ट्राच्या सरहद्दीवरील प्रदेशा-बाबत राज्यपुनर्रचनासमितीचे निर्णयच प्रमाण मानण्यांत आले. फक्त बिदर जिल्ह्यांतील निलंगा, अहमदपूर व उदगीर हे तीन तालुके मराठवाड्या-बरोबर महाराष्ट्रांत घातले. महाराष्ट्राच्या सरहद्दी-वरील मराठीभाषी प्रदेशाबद्दल आपली बाजू कॉंग्रेस-वरिष्ठांपुढें मांडण्यासाठीं अनेक शिष्टमंडळें डिसेंबर-मध्यें दिल्लीस गेलीं होतीं. त्या सर्वांच्या मागणीस वाटा-ण्याच्या अक्षताच लागल्या व रा. पु. समितीनें शिफारस-लेल्या सरहद्दीच सरकारनें मान्य केल्या; फक्त वरील बदल केला. अर्थात् याची प्रतिक्रिया निपाणी, बेळगांव, कारवार या भागांत अत्यंत तीव्र झाली. इतर राज्यांचे बाबतींत पंजाब व विशाल आंध्र यांबाबत निर्णय पुढें देण्यांत येईल म्हणून सांगितलें. रा. पु. समितीनें शिफारसलेल्या कर्नाटक राज्यास म्हैसूर हें नांव दिलें. बाकीचीं राज्यें रा. पु. समितीनें शिफारसल्या-प्रमाणेंच ठेवून सरहद्दीबाबत कांहीं किरकोळ दुरुस्त्या केल्या. सरहद्दीवरील विवाद्य प्रदेशांबाबत संबंधित पक्ष जर उभयमान्य अशी कांहीं दुरुस्ती सुचवितील तर तीहि मान्य केली जाईल असें सांगितलें. बेल्लारीबाबत अखेरचा निर्णय दिला नाहीं.

या निर्णयाचे वेळीं पंडित नेहरूंनीं केलेल्या निवेदनांत मुंबई हा महाराष्ट्राचा भाग आहे असें मान्य केल्यासारखीं वाक्यें आहेत ही गोष्ट खरी. 'मुंबई-शहर भौगोलिक दृष्ट्या महाराष्ट्रानें वेढलेलें आहे व तें त्याचा भागहि आहे असें म्हणतां येईल – मुंबईंत सर्वांत मोठा भाषिक गट महाराष्ट्रीयांचा आहे, त्यांचें नेहमीं प्रमुख स्थान रहाणारच'– पण एवढें म्हणून अखेर त्याचा वेगळा राज्यघटक केला तर महाराष्ट्रीयांचें समाधान कसें होणार ? शिवाय मुंबईवर महा-








राष्ट्राची राजकीय सत्ता राहिली नाहीं तरी त्याची राजधानी तेथें राहील अशी एक आशा होती. पण महाराष्ट्राची राजधानी त्याच्याच प्रदेशांत राहील असा सरकारी निर्णयांत स्पष्ट उल्लेख असल्यामुळें तेंहि समाधान राहिलें नाहीं. मुंबई कायमची केंद्रशासित याची प्रतिक्रिया मुंबईतील महाराष्ट्रीयेतर अल्पसंख्य जमातींतहि फारशी समाधानकारक झाली नाहीं. लोकशाही युगांत मुंबईसारख्या शहरांत स्वायत्ततेचा हक्क काढून घेणें प्रतिगामी होतें व रा. पु. समितीनें आपल्या अहवालांत तसें स्पष्ट म्हटलेंहि होतें. मुंबईतील नागरिकांचा तेथील राज्यकारभाराशीं संबंध आणून त्यांची सल्लामसलत घेण्याचा मार्ग काढतां येईल असें जरी या निवेदनांत विधान असलें तरी त्यांचा लोकशाहींतील मूलभूत मतदानाचा हक्क हिरावला गेलाच हें उघड होतें. मुंबईस राज्याचा दर्जा असता तर तेथील नागरिकांचे लोकशाही हक्क तरी राहिले असते. हा निर्णय होण्याच्या आदल्याच दिवशीं चौपाटीवर अनेक संस्थांतर्फे एक विराट् सभा होऊन तेथें मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीस पाठिंबा देण्यांत आला होता. एवढी विराट् सभा पं. नेहरूंच्या व्याख्यानाखेरीज पूर्वी कधीं झाली नव्हती. श्री. काकासाहेब गाडगिळांचें या सभेंत भाषण झालें होतें व त्यांनीं केंद्रशासित मुंबई-योजनेस विरोध केला होता. पण दुसरें दिवशीं तेंच मुंबईचें भवितव्य हा निर्णय अधिकृतरीत्या ऐकावयास मिळाला. या पूर्वी पंधरावीस दिवस मुंबईच्या निरनिराळ्या भागांत प्रचंड सभा भरत व तेथें मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीस जोरानें पाठिंबा मिळे. कॉंग्रेसजनांच्या तसेंच विरोधीपक्षीयांच्याहि अशा प्रचंड सभा होत. या परिस्थितींत हा निर्णय अनधिकृतरीत्या आधींच कळला असल्यामुळें आतां लढ्याची भाषा सर्वत्र ऐकूं येत होती. पुढारी लढ्याचा काय आदेश देतात इकडे लोकांचें लक्ष होतें. वाटाघाटींच्या गोष्टी अगर हा निर्णय निमूटपणें सहन करण्याची भाषा लोकांना रुचत नव्हती. वजनदार कॉंग्रेस पुढाऱ्यांनाहि सभेंत हटकलें जाऊं लागलें. मंत्र्यांनीं व आमदारांनीं राजीनामे देऊन याच्या प्रतिकारास तयार व्हावें व राज्ययंत्रास खीळ घालावी अशी उघड उघड मागणी लोक करूं लागले. पुढाऱ्यांनीं मार्ग दाखविण्याऐवजीं जनताच आतां पुढाऱ्यांना मार्ग दाखवीत आहे असें दिसूं लागलें. या पार्श्वभूमीवर या निर्णयाचें स्वागत कसें होईल याची कल्पना केली तर नंतर मुंबईत उठलेला प्रक्षोभाचा डोंब कदाचित् अनपेक्षित म्हटला तरी क्रमप्राप्त किंवा अनिवार्यच म्हटला जाईल.

### उसळलेला प्रक्षोभ

सरकारनें एकप्रकारें आपल्या कृतीनें हा डोंब भडकावण्यास साहाय्यच केलें असें म्हणावें लागेल. ब्रिटिश राजवटीचे तंत्रानुसार निर्णय ता. १६ रोजीं रात्रीं जाहीर झाला तर आधीं सकाळींच मुंबईत कम्युनिस्ट पुढाऱ्यांची व संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळींतील इतर प्रमुख लोकांची धरपकड केली. सामान्य कार्यकर्तेहि बऱ्याच प्रमाणांत पकडले. गेले. निर्णय जाहीर होण्या अगोदरच सरकारनें या रीतीनें आपणहून ठिणगी टाकली. या धरपकडीचे निषेधार्थ गिरण्या बंद पडल्या. कामगार-भागांत हरताळहि पडला. रात्रीं अधिकृत निर्णय लोकांनीं ऐकला. ता. १६ च्या रात्रीपासून दंगा भडकला. ट्राम, बस यांवर हल्ले होऊन त्यांची जाळपोळ सुरूं झाली. गोळीबारहि सुरूं झाला. पोलिस-बंदोबस्त सकाळपासून जय्यत होताच. कामगार-भागांत सभा होऊन पुढाऱ्यांच्या अटकेबद्दल निषेध करण्यांत आला व पुनः संपाचा आदेश देण्यांत आला. पोलीसांवर दगड, ॲसिड बल्बचा मारा सुरूं झाला. पोलीसहि बेछूटपणें गोळीबार करीत. गर्दी हटविण्यासाठींहि गोळीबाराचा वापर सर्रास होऊं लागला. गोळीबार होऊन माणसें मेलीं त्या भागांत दंगल अधिकच भडके. जमावाचा व पोलीसांचा सामना चालून रणभूमीचें दृश्य दिसे. तिसरे दिवशीं कोणीतरी डाव्या गटाच्या सामान्य माणसानें पुनः संपाचा आदेश दिला. परिस्थिति अधिकच बिघडत चालली. ट्राम-बस – वहातूक बंद पडली. रेल्वे वाहतुकींतहि भयंकर अडथळे होऊन ती कोठें बंद पडली तर कोठें अत्यंत अनियमित चालूं राहिली. पहिल्या एकदोन दिवसांत खाजगी मालमत्तेची जाळपोळ अगर लुटालूट फारशी झाली नाहीं. पोलिसांवर विशेष रोख होता. सार्वजनिक मालमत्तेची मोडतोड करून वाहतुकींत अडथळा करण्यांत येई. दोनतीन दिवसांनंतर पुढें मात्र दंगलीची झळ गुजराती जमातीच्या लोकांना विशेष लागूं लागली. त्यांच्या दुकानांची, घरांची लुटालूट होऊन जाळपोळ सुरूं झाली. कांहीं मारवाडी जमातीचे लोकांनाहि झळ लागली. कामगार-भागांतहि जाळपोळ व लुटालूट












मोठ्या प्रमाणांत झाली. मिश्र वस्तीच्या भागांतहि दंगल झाली. पण लुटालूट व जाळपोळ मोठ्या प्रमाणावर झाली नाहीं. उपनगर-भागांतहि पुढें दंगल पसरली व लुटालूट, जाळपोळ सुरू झाली. प्रत्यक्ष लुटालूट होऊन गेल्यावरच पोलीस तेथें बहुधा पोंचत. त्यामुळें तेथें जो गोळीबार होई त्यांत दंगलखोरापेक्षां इतर बघेच मृत्युमुखीं पडत. नेहमींच्या सराईत गुन्हेगारांना व गुंडांना चांगलीच संधि मिळाली. ता. १८ जाने. पासून मुंबईंत कर्फ्यू संध्याकाळ ते सकाळ लागू केली. कांहीं भागांत दिवसांहि होती. दंगलीचें प्रमाण २०-२१ तारखेपासून कमी होऊं लागलें. फोर्ट भाग प्रामुख्यानें व महाराष्ट्रीयेतर वस्तीचा भाग व श्रीमंत वस्तीचा मलबारहिलबाजूचा भाग सोडला तर सर्व मुंबईंत ता. १६ पासून जवळजवळ ७।८ दिवस दंगलीची परिस्थिति होती. लालबाग, परळ, वरळी-कडील कामगार वस्तीचा भाग व गिरगांव, ठाकूरद्वार या भागांत दंगल फारच झाली. कामगार-वस्तींतील गरीब गुजराती व्यापारी कुटुंबांची परिस्थिति अनुकंपनीय झाली. निर्वासित होऊन गुजरातकडे जाणाऱ्यांची रीघ लागली. अगर शहरांतच कोठेंतरी आश्रयार्थ अनेक कुटुंबें गेलीं. पूज्य राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या प्रतिमांवर पादत्राणांच्या माळा घालण्यासारखे हीन अभिरुचीचे प्रकारहि झाले. एकंदरींत माणुसकीला काळिमा आणणारे सर्व प्रकार झाले. असें असलें तरी माणुसकीनें व स्वतः धोका पत्करूनहि अल्पसंख्याकांचें रक्षण केल्याचीं उदाहरणें आहेत. दंगलखोरांचा रोख मुख्यतः गुजराती व कांहीं मारवाडी (-कदाचित् गुजराती व मारवाडी यांत ते फरक करीत नसावेत-) यांच्यावरच होता. मुंबईंत इतर अनेक जमातींचे अल्पसंख्य आहेत. पण त्यांना याची झळ लागली नाहीं. क्वचित् ठिकाणीं महाराष्ट्रीयांनाहि झळ लागली आहे. झाल्या प्रकारानें प्रत्येक सुजाण संयुक्त महाराष्ट्रवाद्याला खालीं पहावें लागलें. हे प्रकार होऊं लागले असें कळतांच त्याचा प्रतिरोध करून शांतता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न संयुक्तमहाराष्ट्रवादी पुढारी व कार्यकर्ते करूं लागले होते. या दंगलींत पोलीसांनीं अतिरेक केल्याच्या व वाटेल तसा बेछूट गोळीबार केल्याच्या पुष्कळ तक्रारी आहेत. दंग्याचें वातावरण वाढण्यास ही गोष्टहि कारणीभूत झाली आहे. अधिकृत आंकडा ७०-७५ चा असला तरी यांपेक्षां कितीतरी जास्त लोक गोळीबारांत मेले असावेत असें मानण्यास जागा आहे. ८००-१००० पर्यंत जखमी आहेत. धरपकड तर ६ हजारपर्यंत झाली आहे. कोणासहि संशयावरून कोठेंहि पकडीत. चाळींत अश्रुधूर सोडण्यासारखेहि अतिरेक झाले आहेत.

महाराष्ट्रांत इतर कांहीं ठिकाणींहि हा निर्णय जाहीर झाल्यावर दंगल झाली. बेळगांव, निपाणी, कोल्हापूर, नाशिक या ठिकाणीं विशेष झाली. बेळगांवला गोळीबार होऊन ४ लोक मेले. तेथें कर्फ्यू जारी करावा लागला. कोल्हापूर, नाशिक येथें अल्पसंख्याकांच्या विशेषतः गुजराल्यांच्या मालमत्तेची लुटालूट व जाळपोळ झाली. हरताळ, संप, निषेधसभा तर महाराष्ट्रांत सर्वत्र झाल्या.

### म. प्र. कॉंग्रेस कार्यकारिणीची सभा

निर्णय जाहीर झाल्यावर लगेच तांतडीनें महाराष्ट्र प्र. कॉंग्रेसच्या कार्यकारिणीची सभा ता. १९ जाने. ला पुण्यास बोलावली. कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें व केंद्र सरकारनें संयुक्त महाराष्ट्रासंबंधीं जो निर्णय घेतला त्याबद्दल दुःख व्यक्त करण्यासाठीं म्हणून मुंबई व मध्यसरकारांतील मंत्री, उपमंत्री, आमदार, खासदार यांनीं राजीनामे द्यावेत असा ठराव मंजूर करण्यांत आला. मंत्री-उपमंत्र्यांनीं तावडतोब राजीनामे द्यावेत व आमदार-खासदारांनीं आपले राजीनामे प्र. कॉंग्रेसचे अध्यक्षामार्फत पार्लमेंटरी बोर्डाकडे पाठवावेत, असें ठरलें. सरकारी निर्णयामुळें महाराष्ट्रांतील जनता व कॉंग्रेस कार्यकर्ते यांमध्यें जें असमाधान व नैराश्य पसरलें आहे तें व्यक्त करण्यासाठीं कॉंग्रेस कार्यकर्त्यांना मोकळा असलेला एकच मार्ग म्हणजे वरीलप्रमाणें राजीनामे देणें होय असें त्या ठरावांत म्हटलें होतें. संयुक्त महाराष्ट्राच्या मुंबईंस व इतरत्र झालेल्या दंगलीचा व हिंसक कृत्यांचाहि त्यांत निषेध केला होता. शांततेच्या व लोकशाही मार्गानें संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न सोडविण्याचा महाराष्ट्र कॉंग्रेस प्रयत्न करील असेंहि म्हटलें होतें. शेवटीं कॉंग्रेस-संस्थेशीं आम्हीं निष्ठावान् आहोंत व पुढेंहि तसेंच राहूं असें त्यांत म्हटलें होतें.

कार्यकारिणीच्या या सभेस मराठवाडा व विदर्भांतील कॉंग्रेसपक्षीय पुढारी व मंत्री निमंत्रित म्हणून हजर होते. राजीनामे देण्याच्या धोरणास मराठवाड्यांतील कॉंग्रेसपुढाऱ्यांचा पाठिंबा दिसून आला. किंबहुना, स्वामी रामानंदतीर्थ वगैरे तिकडील पुढारी मंडळी राजीनामे देऊन घटनात्मक पेचप्रसंग घडवून आणणें







इष्ट आहे या मताची होती. अर्थात् या क्रियेशीं खास संबंधित मुंबई-महाराष्ट्रांतील मंडळी असल्यानें त्यांच्या एकंदर धोरणाशीं जुळवून घेण्याचें तिकडील मंडळींचें धोरण दिसून आलें. पण विदर्भांतील पुढारी-मंडळी मुंबईच्या प्रश्नावर राजीनामे देण्याच्या मार्गाचा अवलंब न करतां सध्यां मुंबईखेरीज संयुक्त महाराष्ट्र स्वीकारावा, पुढें मुंबई मिळेल या मताची होती. विदर्भाचा प्रश्न अनिर्णीत राहूं नये यासाठीं तिकडील मंडळींचें असें मत बनणें स्वाभाविक होतें. परंतु या निर्णयानें तो आतां अनिर्णीत राहिला नव्हता. तथापि महाराष्ट्रीय कॉंग्रेस-मंडळींचें राजीनामे देण्याचें धोरण त्यांना पसंत नव्हतें. पण या ठरावांतील धोरणाप्रमाणें कॉंग्रेसनिष्ठ व कॉंग्रेसच्या शिस्तींत राहून राजीनामे देण्याचा कार्यक्रम घडून येणारच नाहीं याची त्यांना खात्री असल्यामुळें विशेष विरोध करण्याच्या भानगडींत ते पडले नाहींत. नागपूरला महाराष्ट्राची राजधानी करण्याबाबत कांहीं मंडळींनीं उचल खाल्ली होती. फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यांत अकोल्यास विदर्भ-कॉंग्रेसची बैठक झाली त्यावेळींही हा प्रश्न निघाला होता. पण मुंबई संबंधाचा अखेरचा निर्णय लागेपर्यंत नागपूर राजधानीचा प्रश्न पुढें आणूं नयें असें ठरलें.

## शांतिप्रस्थापनेचें कार्य

ता. १६ ला राज्यपुनर्रचनेसंबंधानें सरकारी निर्णय जाहीर झाल्यावर महाराष्ट्र कॉंग्रेस आतां काय करणार याकडे सर्वांचे डोळे लागले होते. इतर पक्षांनीं तर लढ्याचें शिंग फुंकलेंच होतें पण महाराष्ट्र-कॉंग्रेस काय ठरवते व संयुक्तमहाराष्ट्र-परिषद् किंवा तिचे सर्वाधिकारी श्री. शंकरराव यापुढें काय कार्यक्रम ठरवितात, काय आदेश देतात तें पाहून त्यापुढें मग प्रत्यक्ष लढ्याचा कार्यक्रम सुरू करावा असें त्यांचें धोरण होतें. निर्णय जाहीर झाल्यापासून महाराष्ट्र-कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांच्या सतत वाटाघाटी सुरू होत्या. मुंबईतलें व महाराष्ट्रांतील एकंदर वातावरण पाहतां, तसेंच महाराष्ट्रीय कॉंग्रेस-जनांच्याहि भावना लक्षांत घेतां मंत्रिपदें व आमदार-पदें सोडण्याचें ठरविल्याखेरीज जनतेचें समाधान होणार नाहीं हें स्पष्ट दिसून येऊं लागलें होतें. प्रथम किमान ही गोष्ट घडली तरच मग पुढें शांततेच्या व लोकशाही मार्गानें लढ्याचा अन्य कार्यक्रम ठरविण्यांत कांहीं अर्थ होता. निर्णय जाहीर झाल्यावर श्री. शंकरराव देवांनीं पत्रक काढलें होतें कीं शांततेच्या व लोकशाही मार्गानें मुंबईसह संयुक्तमहाराष्ट्र हें आमचें ध्येय आम्ही मिळविण्याचा प्रयत्न करीत राहूं. स्वतः श्री. शंकररावांनीं गेले कित्येक महिने मनांत योजलेलें दीर्घ मुदतीचें उपोषण करण्याचें ठरविलें. त्याचबरोबर सरकारशीं संपूर्ण असहकाराचा कार्यक्रम जनतेपुढें ठेवण्याचाही ते विचार करीत होते. श्री. शंकररावांनीं पं. नेहरूंना एक सविस्तर पत्र लिहिण्याचें ठरवून त्यांत सरकारी निर्णयानें आपलें व महाराष्ट्राचें झालेलें असमाधान व स्वतःच्या उपवासाची पार्श्वभूमि तसेंच जनतेच्या पुढील चळवळीची दिशा कळविण्याचें ठरविलें होतें. पण पुढें मुंबईत घडलेल्या भीषण घटनांमुळें श्री. शंकररावांचा हा कार्यक्रम बदलला असें दिसतें. सरकारनें कम्युनिस्टांना आधींच उचलल्यामुळें त्यांच्याशीं वाटाघाटी करून संयुक्त महाराष्ट्रासंबंधींच्या कोणत्याहि कार्यक्रमास अगर चळवळीस हिंसक वळण लागूं नये याबाबत प्रयत्न करण्यास वावच राहिला नाहीं. एस्. एम्. जोशी प्रभृति समाजवादी महाराष्ट्रीय मंडळींनीं शंकररावांना भेटून पुढील कार्यक्रमासंबंधीं चर्चा केली होती. मुंबईतील सयुंक्त महाराष्ट्रवादी कॉंग्रेसजनहि शंकररावांच्या असहकाराच्या कार्यक्रमास पाठिंबा देत होते. महाराष्ट्र कॉंग्रेस काय ठरविते इकडे मात्र सर्वांचें लक्ष होतें. महाराष्ट्र-कॉंग्रेस-पुढाऱ्यांतील दोन विचार-प्रवाह लक्षांत घेतां किमान राजीनामे देण्याच्या कार्यक्रमाबाबतहि एकमत होईल कीं नाहीं याबद्दल अनेकांना शंका होती. पण महाराष्ट्रांतील जनतेच्या भावना या प्रश्नावर एवढ्या प्रक्षुब्ध झाल्या होत्या कीं त्यास साद न देणें महाराष्ट्रीय कॉंग्रेस-पुढाऱ्यांना शक्यच नव्हतें. पण राजीनामे देण्याचा ठराव पास केला खरा, पण ज्या पद्धतीनें हे राजीनामे द्यावयाचे व ठरावांत म्हटल्याप्रमाणें अखेर कॉंग्रेससंस्थेशीं एकनिष्ठ राहावयाचें तें कसें घडणार हा प्रश्न होता.

ता. २० जानेवारीस मुंबई येथें संयुक्त महाराष्ट्र परिषदेच्या कार्यकारिणीची सभा बोलाविली होती. पण रेल्वे-वाहतुकींत अडथळे आल्यामुळें परगांवची मंडळी येऊं शकली नाहींत. मुंबईत असणारी मंडळी जमली तेवढ्यांनीं अनौपचारिक चर्चा केली. पुण्यास श्री. शंकरराव ता. १९ रोजीं गेले होते. तेथें त्यांनीं सं. म. परिषदेच्या कांहीं प्रमुख मंडळींशीं चर्चा केली होती. पण ती मंडळी सभेस येऊं शकली नाहींत.








म्हणून कार्यकारिणीची रीतसर सभा न होतां अनौपचारिक चर्चा म्हणून झाली. श्री. शंकररावांनीं यापुढें सर्वपक्षीय भूमिकेवरून परिषदेचें कार्य चालविणें कसें कठीण आहे तें विशद करून सांगितलें. हें लक्षांत घेऊनच मागील सभेंत आपापल्या पक्षीय व्यासपीठावरून चळवळ करण्याचें स्वातंत्र्य सर्वांना दिलें होतें. यापुढें ती विसर्जित करावयाची कीं पुनः सर्वपक्षीय भूमिकेवरून कांहीं कार्य करण्यासारखा प्रसंग आल्यास त्यासाठीं उपयोगी पडावी म्हणून तूर्त स्थगित करावयाची याबद्दल निर्णय घ्यावा लागेल असें ते म्हणाले. नंतर जमलेल्या मंडळींत यासंबंधानें कांहीं चर्चाहि झाली. पण ही अनौपचारिक चर्चा असल्यामुळें व रीतसर सभा झाल्याशिवाय निर्णय घेणें शक्य नसल्यामुळें सध्यां अत्यंत महत्त्वाचा कार्यक्रम म्हणजे मुंबईंत शांतता प्रस्थापन करण्याचा आहे व त्यावर येत्या दहा दिवसांत सर्व लक्ष केंद्रित करावें व सर्वांनीं त्यासाठीं झटावें असें ठरवून ही सभा बरखास्त झाली. सभेस हजर असलेल्या सर्व पक्षांच्या मंडळींनीं यास संमति दिली. सभा चालू असतांना बाहेर शेकडों लोक जमले होते व परिषद् काय कार्यक्रम सांगते याची आतुरतेनें वाट पहात होते. सभेंतून शंकरराव बाहेर आल्यावर त्यांना लोकांनीं घेरलें. शंकरराव म्हणाले तूर्त आम्हीं कोणताच कार्यक्रम ठरविला नाहीं – प्रथम मुंबईंत शांतता प्रस्थापित केली पाहिजे व त्यासाठीं आपण सर्वांनीं झटलें पाहिजे एवढेंच तूर्त ठरविलें आहे. लोक खवळले होते. 'गोळीबारांत इतकीं माणसें मारलीं त्याचा सरकारला जाब कां विचारीत नाहीं. आम्हांलाच तेवढी शांतता सांगतां, इत्यादि प्रत्युत्तरें होऊं लागलीं. जमावाचें समाधान करणें बरेंच कठिण गेलें.

सभेंत ठरल्याप्रमाणें शंकरराव देव, मुंबईंतील संयुक्तमहाराष्ट्र काँग्रेसजनपक्षाचे डॉ. नरवणे प्रभृति पुढारी व कार्यकर्ते, एस्. एम्. जोशी प्रभृति प्रजासमाजवादी पुढारी व कार्यकर्ते, मुंबई असेंब्लीचे स्पीकर श्री. कुंटे, श्री. नौशेर भरूचा व इतरहि अनेक कार्यकर्ते मुंबईंत शांतता प्रस्थापनेसाठीं दंगलग्रस्त भागांत हिंडूं लागले. पुढाऱ्यांचे लोक ऐकत पण त्यांचेशीं अनेक उत्तरें प्रत्युत्तरें करण्याची पाळी येई. गोळीबारानें माणसें मेलेलीं व असंख्य लोक पकडलेले यामुळें लोक संतप्त झाले होते. पुढाऱ्यांनीं चळवळीचा कार्यक्रम कां दिला नाहीं म्हणून सर्वत्र विचारणा होई. पण त्यांची समजूत घालून प्रथम शांतता प्रस्थापित केली पाहिजे हें त्यांना पटवून दिलें जाई. दंगलींत झालेल्या अमानुष प्रकाराबद्दल व अल्पसंख्य जमातींवर हल्ले करून त्यांची लुटालूट व जाळपोळ केल्याबद्दल त्या भागांत रहाणाऱ्या सामान्य कामगार वर्गालाहि वाईट वाटत होतें. खरें म्हणजे मुंबईंत 'दादा' समजले जाणारे गुंड व इतर गुन्हेगार प्रवृत्तीच्या लोकांनीं या अशांततेचा फायदा घेतला होता. पुढें तर याच लोकांच्या हातीं या चळवळीचें म्हणजे दंगलीचें पुढारीपण गेलें आहे असें दिसून आलें. राजकीय अशांततेचा आपल्या समाजविरोधी कृत्यासाठीं ते उपयोग करून घेत इतकेंच. पोलीसांनीं अतिरेक केले हें मान्य केलें तरी शांतता प्रस्थापित करण्याची कामगिरी त्यांनींच बरीचशी केली हें मान्य करावें लागेल. ता. २१, २२ पासून गिरण्या हळूहळू सुरू होऊन लोक कामावर जाऊं लागले. २४, २५ पासून बहुतेक परिस्थिति निवळली व पूर्ववत् व्यवहार सुरू झाले असें दिसून आलें.

### राजीनामा प्रकरणाचें नाटक !

महाराष्ट्र-प्रदेश काँग्रेस कार्यकारिणीच्या ठरावाप्रमाणें हिरे, चव्हाण या दोन मंत्र्यांनीं व दोन उपमंत्र्यांनीं राजीनामे दिले, पण ते मुख्यमंत्र्यांनीं स्वीकारले नाहींत. दिल्लींत श्री. चिंतामणराव देशमुखांनींहि राजीनामा दिला. पण तोहि स्वीकारण्यांत आला नाहीं. आमदारखासदारांनीं आपले राजीनामे प्रदेश काँग्रेसमार्फत पार्लमेंटरी बोर्डाकडे पाठविले. पण 'प्रदेश-काँग्रेसला राजीनामे देण्याचा आदेश देतां येत नाहीं. तो अधिकार मध्यवर्ती पार्लमेंटरी बोर्डाचा आहे. मंत्री, उपमंत्री, सभासद यांनीं कोणीहि आपल्या जागांचे राजीनामे देऊं नयेत' असा काँग्रेस-वरिष्ठांनीं व वर्किंग कमिटीनें आदेश दिला. दिल्लीला ता. २२, २३ ला वर्किंग कमिटीची बैठक होऊन मुंबईंत व इतरत्र ओरिसा वगैरे ठिकाणीं झालेल्या दंगलीचा व भारताच्या प्रतिष्ठेस व एकतेस बाध आणणाऱ्या हिंसक कृत्यांचा तीव्र निषेध करण्यांत आला; यामुळें आमच्या निर्णयांत बदल होणार नाहीं हें त्यांनीं जाहीर केलें. यांत अनपेक्षित असें कांहींच नव्हतें. राजीनामे देण्याच्या ठरावाला काँग्रेस वर्किंग कमिटीकडून संमति मिळणें कदापि शक्य नव्हतें. हा ठराव करून महाराष्ट्र काँग्रेसनें आपल्या भावना व्यक्त केल्या खऱ्या, पण काँग्रेसच्या शिस्तीखातर कृति घडून येणें शक्य नाहीं. हें दिसत असतां-







ना असा ठराव करणें म्हणजे जनतेची दिशाभूल व फसवणूक करण्याचा तो एक मार्ग आहे अशीच यासंबंधानें महाराष्ट्रांत प्रतिक्रिया झाली. त्यानंतर ता. २८ ला पुणें येथें महाराष्ट्र प्र. कॉंग्रेसच्या सर्वसाधारणसभेची बैठक झाली. कार्यकारिणीच्या राजीनाम्याच्या ठरावाबाबत वर्किंग कमिटीनें दिलेला निर्णय लक्षांत घेतां या सभेत काय घडणार इकडे सर्वांचें लक्ष होतें. राजीनाम्याच्या भूमिकेस चिकटून राहून त्याप्रमाणें वागायचें तर कॉंग्रेस संघटनेंतून बाहेर पडावें लागणार हें उघड दिसत होतें. या प्रश्नावर सर्व महाराष्ट्रीय कॉंग्रेस पुढारी खंबीर असते तर महाराष्ट्र कॉंग्रेस संघटनाच अ. भा. संघटनेंतून बाहेर पडली असती. पण तशी परिस्थिति नव्हती. किंबहुना, प्रदेश कमिटींत अल्पमत अगर बहुमत कांहींहि मिळो, कॉंग्रेस वर्किंग कमिटीची परवानगी नसली तरीहि राजीनाम्याच्या निर्धारास चिकटून राहण्याची कोणाहि पुढाऱ्याची तयारी दिसली नाहीं. त्यामुळें ठराव केला तोहि पुनः दिशाभूल करणाराच. या ठरावांत कार्यकारिणीच्या मागील ठरावाची पार्श्वभूमि सांगून कॉंग्रेस-शिस्तीचा अगर निष्ठेचा भंग करण्याचा त्यांत उद्देश नव्हता, या मार्गानें जनतेच्या दुःखाशीं समरस होऊन कॉंग्रेस विरोधकांनीं व समाज कंटकांनीं लोकांच्या असंतोषास विघातक वळण देण्याचा जो प्रयत्न चालविला होता तो हाणून पाडून कॉंग्रेस मजबूत करण्याचाच आमचा उद्देश होता, पण या आमच्या भावनांशीं वर्किंग कमिटी सहमत होऊं शकली नाहीं याबद्दल खेद व्यक्त करण्यांत आला व पुनः आमच्या भावना व परिस्थिति लक्षांत घेऊन मंत्री, उपमंत्री, आमदार, खासदार यांचे राजीनामे मंजूर करावेत अशी विनंति केली. तसेंच संयुक्तमहाराष्ट्राच्या नांवावर जे अत्याचार व लाजिरवाण्या गोष्टी घडल्या त्याचा निषेध करून कॉंग्रेस-विरोधी संस्था व पक्ष या निमित्तानें कॉंग्रेसला नामशेष करूं पहात आहेत त्याचा कॉंग्रेस कार्यकर्त्यांनीं मुकाबला केला पाहिजे असें सांगून कॉंग्रेसच्या द्वाराच आम्ही मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचें ध्येय गांठूं असें या ठरावांत म्हटलें होतें. दुसऱ्या एका ठरावांत संयुक्त महाराष्ट्र परिषदेचे कॉंग्रेसजनांनीं आतां राजीनामे द्यावेत, कारण संयुक्तमहाराष्ट्राच्या मागणीसाठीं एकमुखी निवेदन करण्याचें कार्य संपलें आहे; तेव्हां यापुढें अन्य राजकीय पक्ष असलेल्या संस्थेशीं कॉंग्रेसजनांनीं संबंध ठेवूं नये असें म्हटलें होतें. मुख्य ठरावांतील धोरण पसंत नसणारे बरेच सभासद तेथें होते व त्यापैकीं कांहींनीं विरोधी भाषणें करून आपल्या उपसूचनाहि पाठविल्या होत्या. अर्थात् त्या सर्व बहुमतानें फेटाळल्या गेल्या. कॉंग्रेसच्या शिस्तीखातर या प्रश्नावर कांहीं न करितां स्वस्थ बसल्यास कॉंग्रेसकार्यकर्त्यांना महाराष्ट्रांत सार्वजनिक जीवनांतून नामशेष व्हावें लागेल असें स्पष्टपणें या सभासदांनीं बोलूनहि दाखविलें. पण कोणाहि पुढाऱ्याची या मुद्द्यावर कॉंग्रेसमध्यें व राज्यसरकारांतहि पेंचप्रसंग घडवून आणण्याची तयारी नव्हती. एवढेंच नव्हे तर ज्यांच्या संबंधानें लोकांना कांहीं अपेक्षा वाटत होती त्या श्री. भाऊसाहेब हिऱ्यांनींच या विरोधकांना धाक घालून गप्प बसविण्याचा प्रयत्न केला. आम्ही सर्व कार्यकारी मंडळांतून बाहेर पडतो, तुम्ही आमच्या जागा घ्या, आम्हांस शक्य होतें तें सर्व आम्ही केलें आहे, असा धाक घालण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. पुनः केलेली आमची विनंति जर वर्किंग कमेटीनें पुनः नाकारली तर आम्ही राजीनामे देणार नाहीं हेंहि त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें. यावरून स्पष्ट कळून चुकलें कीं हें राजीनामे-प्रकरण केवळ एक नाटकच ठरणार. कोणीहि समक्ष जाऊन व्यक्तिशः विनंति केली तरी वर्किंग कामिटी व कॉंग्रेस-वरिष्ठ ती मान्य करणार नाहींत हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट असतांना असा ठराव करण्यांत जनतेची दिशाभूल करून वेळ मारून नेण्याखेरीज दुसरा कोणताहि उद्देश असावा असें वाटत नाहीं. महाराष्ट्रांत याची प्रतिक्रिया अत्यंत नैराश्यात्मक होऊन जनतेचें सामर्थ्य असतांहि लायक नेतृत्वाच्या अभावामुळें महाराष्ट्राची उपेक्षा होत आहे असें दिसून आलें.

### प्रायश्चित्तार्थ उपोषण

मुंबई व महाराष्ट्रांतील दुःखद घटनांमुळें श्री. शंकरराव देवांनीं पूर्वी ठरविलेला ३० दिवसांच्या उपवासाचा निर्णय बदलला व त्याबरोबरच मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या भावी चळवळीबाबत योजिलेलें धोरणहि त्यांनीं बदललें. मुंबई व महाराष्ट्रांत घडलेल्या माणुसकीस काळिमा लावणाऱ्या प्रकारांनीं त्यांच्या हृदयास अत्यंत दुःख झालें. व या सामाजिक दुष्कृत्यासाठीं प्रायश्चित्त म्हणून ३० जानेवारीपासून ११ दिवस त्यांनीं उपोषण केलें. महाराष्ट्रांतील दुसरे एक पुढारी श्री. रावसाहेब पटवर्धन यांनींहि असेंच प्रायश्चित्तार्थ








१० दिवस उपोषण केलें. उपोषण सुरूं करण्यापूर्वी श्री. शंकररावांनीं एक पत्रक काढून या दंगलींत घडलेल्या प्रकारामुळें आपल्या हृदयास झालेल्या व्यथेचें निवेदन केलें व शांतता प्रस्थापित होऊन बंधुभावाचें वातावरण निर्माण झाल्याखेरीज संयुक्त महाराष्ट्रासाठीं लहान अगर मोठ्या प्रमाणावर शांततामय सत्याग्रहाचा कार्यक्रम देखील कोणीहि सुरूं करूं नये, सरकारी धोरणाबद्दल नापसंती व्यक्त करण्यासाठीं फार तर आपलीं प्रातिनिधिक पदें सोडावींत असें त्यांनीं जाहीर केलें. उपवासाच्या सुरवातीच्या पांच दिवसांत शांततेचा व बंधुभावाचा प्रचार करण्यासाठीं कोल्हापूर–बेळगांव वगैरे दक्षिण महाराष्ट्राच्या भागांत त्यांनीं दौराहि काढला व आपली भूमिका लोकांना समजावून सांगितली. या उपोषणाची महाराष्ट्रीय जनमतांतील सामान्य प्रतिक्रिया फारशी समाधानकारक झाल्याचें आढळून आलें नाहीं. माणुसकीस काळीमा आणणाऱ्या गोष्टी घडल्याबद्दल दुःख झालें तरी या घटनाबाबतची सरकारची जबाबदारी टळत नाहीं. एकंदर हा प्रश्न हाताळण्याच्या सरकारी धोरणाचा, गोळीबाराचा व पोलीसी अतिरेकांचा निषेध न करतां स्वकीयांच्या दुष्कृत्यांबद्दलच तेवढा आटापिटा करीत रहाणें लोकांना पसंत पडलें नाहीं. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राबाबत श्री. शंकरराव व इतर महाराष्ट्रीय कॉंग्रेस पुढारी लोकांच्या भावना आजपर्यंत चेतवीत आले. त्या विफल झाल्यामुळें होणारा लोकक्षोभ उन्मार्गगामी न होऊं देतां त्यास योग्य मार्ग दाखविण्याची त्यांच्यावरील जबाबदारी टळत नाहीं. म्हणून लोकांचें चुकलें असलें तरी लोकक्षोभास कारण होणाऱ्या मूळ सरकारी धोरणास व कृतीस कांहींच जबाबदार न धरतां लोकांचीच सतत बदनामी करून व त्यांनाच दोषी ठरविण्याच्या या पुढाऱ्यांच्या वृत्तीबद्दल सामान्य विचारी जनतेंत फारसें समाधान आढळून आलें नाहीं.

## कॉंग्रेसेतर पक्षप्रतिनिधींची समिति

संयुक्त महाराष्ट्राबाबतचा लढा पुढें चालू ठेवणें अवश्य आहे असें वाटणाऱ्या महाराष्ट्रांतील सर्व कॉंग्रेसेतर राजकीय पक्षांच्या प्रतिनिधींची एक सभा श्री. एस्. एम्. जोशी यांच्या पुढाकारानें ता. ६ फेब्रुवारीस पुण्यास भरून शांततेच्या व लोकशाही मार्गांनीं व मर्यादित सत्याग्रहाचा कार्यक्रम आखून हा लढा चालू ठेवण्याचें त्यांनीं ठरविलें व त्यासाठीं एक संयुक्त महाराष्ट्र समितीहि स्थापन करण्यांत आली. कायदेमंडळें, म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें व ग्रामपंचायती यांतील सर्व सदस्यांनीं संयुक्तमहाराष्ट्राबाबतच्या सरकारी निर्णयाचे निषेधार्थ राजीनामे द्यावेत असाहि त्यांनीं ठराव पास केला. तसेंच राज्यपुनर्रचनेचा वादग्रस्त असा हा अखिल भारतीय प्रश्न भारतांतील सर्व राजकीय पक्षांना विश्वासांत घेऊन व सर्वांचीं एक गोलमेज-परिषद् बोलावून पंडित नेहरूंनीं व भारतसरकारनें सोडवावा असेंहि एका ठरावानें त्यांनीं आपलें मत जाहीर केलें. आणखी एका ठरावानें मुंबईच्या मुख्य मंत्र्यांनीं ज्या रीतीनें हा दंगलीचा एकंदर प्रश्न हाताळला त्यासाठीं व मंत्रिमंडळांत सामुदायिक जबाबदारीचें तत्त्व पाळलें जात नाहीं अशी शंका वाटत असल्यामुळें गव्हर्नरांनीं हें मंत्रिमंडळ बरखास्त करावें, तसेंच कायदेमंडळहि बरखास्त करून संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावर पुनः निवडणुकी घ्याव्यात असें या सभेनें आपलें मत जाहीर केलें. मुंबईच्या मंत्रिमंडळांत सामुदायिक जबाबदारीचें तत्त्व कितपत पाळलें जातें याबद्दल अलीकडे अनेकांना शंका वाटत होती. ही शंका निवळ कॉंग्रेस-विरोधी पक्षांत वाटत होती एवढेंच नव्हे तर कॉंग्रेसपक्षीय जबाबदार मंडळींनाहि वाटत असल्याचें दिसून आलें. ता. २८ जानेवारीच्या महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेसच्या सभेंत मुंबई असेंब्लीचे स्पीकर श्री. कुंटे यांनीं ही शंका घेण्यास सबळ पुरावा आहे असें आपलें मत जाहीरपणें बोलून दाखविलें होतें.

संयुक्त महाराष्ट्राचा लढा चालविण्यासाठीं ही समिति स्थापन झाली असली व तेंच काम ती करणार असली तरी प्रत्यक्ष व्यवहारांत कॉंग्रेस विरोधी चळवळींचें एक व्यासपीठ अशी त्याची परिणति महाराष्ट्रांत होईल कीं काय ? अशी भीति वाटणें अस्वाभाविक नाहीं. परंतु कॉंग्रेस पक्षाचें याबाबतचें एकंदर धोरण व कृति पाहतां ही परिणति अपरिहार्य म्हणण्याखेरीज गत्यंतर नाहीं.

## संयुक्त महाराष्ट्रवादी कॉंग्रेसजनसंघटना

मुंबई शहरांतील संयुक्तमहाराष्ट्रवादी कॉंग्रेसजनांची संघटना दिवसेंदिवस प्रबळ होत असल्याचें दिसून येत आहे. या गटाच्या लोकांनीं कायदेमंडळांतील व कार्पोरेशनमधील आपल्या जागांचे राजीनामे दिलेच आहेत. मुंबई प्र. कॉंग्रेसनें या लोकांवर शिस्तभंगाचा इलाज करून त्यांचें कॉंग्रेससभासदत्व रद्द केलें. याचा परिणाम या संघटनेचा जोर वाढण्यांत झाला. मुंबईंतील अनेक कॉंग्रेस पदाधिकाऱ्यांनीं मुंबई प्र. कॉंग्रेसच्या या







धोरणाचा निषेध म्हणून राजीनामे दिले असून ते या गटांत आले आहेत. अर्थात् ही संघटना संयुक्त महाराष्ट्राची आपली चळवळ स्वतंत्र रीतीनें चालविणार, ती कोणत्याहि काँग्रेस विरोधी पक्षाशीं सहकार्य करणार नाहीं. मुंबई काँग्रेसनें त्यांना बाहेर हाकललें तरी ते काँग्रेसमन म्हणूनच काम करणार आहेत. आपला कार्यक्रम आखतांना महाराष्ट्र-काँग्रेसशीं अगर महाराष्ट्रांतील प्रमुख काँग्रेसजनांशीं अनौपचारिक चर्चा करून त्यांच्या सहकार्यानें चालण्याचें या गटाचें धोरण दिसतें. काँग्रेसच्या शिस्तींत राहून मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची चळवळ महाराष्ट्र काँग्रेसला अगर महाराष्ट्रांतील काँग्रेसजनांना करतां येत नसल्यास त्यांनीं मुंबईप्रमाणें महाराष्ट्रांतहि संयुक्त महाराष्ट्रवादी काँग्रेसजनांची संघटना उभारून हें कार्य करावें असें या गटास वाटतें. पण महाराष्ट्रांतील परस्थिति पाहतां तसें होईल असें दिसत नाहीं. काँग्रेसविरोधी पक्षाशीं संयुक्त महाराष्ट्र चळवळीबाबत हा गट सहकार्य करणार नसला तरी त्यांच्याशीं विरोध निर्माण होणार नाहीं. या दृष्टीनेंच तो आपले कार्यक्रम आंखील असें दिसतें.

प्रजासमाजवादीपक्षाच्या मंडळींनींहि कायदेमंडळें व मुंबई कॉर्पोरेशन यामधील जागांचे राजीनामे दिले आहेत. महाराष्ट्रांतील बऱ्याच म्युनिसिपालिट्या, लोकल-बोर्डें व ग्रामपंचायती यांतील सदस्यांनीं राजीनामे दिले आहेत. महाराष्ट्रांतील काँग्रेसविरोधी पक्षाच्या बहुतेक सदस्यांनीं तसेंच कांहीं काँग्रेस-सदस्यांनीं विधिमंडळाचे राजीनामे दिले आहेत. महाराष्ट्र काँग्रेसच्या ता. २८ च्या ठरावाची आतां बासलात लागली असून त्यांना काँग्रेस वर्किंग कमिटी परवानगी देत नसल्यामुळें त्यांचे राजीनामे हें केवळ एक नाटकच ठरलें.

## बहुभाषिक राज्यांचे वारे !

यापुढें संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचें भवितव्य कांहींहि होवो पण मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र राज्याची निर्मिति ही गोष्ट अटळ आहे हें निःसंशय. मुंबई व भारतांतील या भाषिक दंगलीनंतर या पुनर्रचनेच्या प्रश्नास वेगळीच कलाटणी देण्याचा आज काँग्रेसवरिष्ठांकडून प्रयत्न होत आहे. बंगाल–बिहारचें एकीकरण करण्याचा त्या दोन प्रांतांच्या मुख्य मंत्र्यांनीं घेतलेल्या निर्णयानंतर त्या दिशेनें एकंदर भारतांतच तसे वारे वाहवण्याचा प्रयत्न सुरू झाला आहे. ज्या बंगाल – बिहारच्या मुख्य मंत्र्यांनीं हें ठरविलें त्यांनाहि आपल्या प्रांतांतील लोकमताचा पाठिंबा मिळवून ही गोष्ट घडवून आणणें कितीसें शक्य आहे हा प्रश्नच आहे. दक्षिण प्रदेश, पश्चिम प्रदेश अशा बहुभाषिक प्रांतांचें भारतांत जोरानें वाहूं लागलेले हे वारे बहुतेक लवकरच वरच्यावर विरून खालचा वस्तुस्थितीचा अथांग सागर तसाच शांत आहे असं दृश्य पहावयास मिळेल. वस्तुस्थितीपासून पळून जाण्यानें वस्तुस्थितींत कसा बदल घडवून आणतां येईल ? या दृष्टीनें श्री. जयप्रकाश नारायण व आचार्य नरेंद्रदेव यांनीं प्रगट केलेल्या विचारांची दखल घेऊन भाषिक भांडणाचा हा रोग समूळ नाहींसा करण्याचा कांहीं तर्कशुद्ध प्रयत्न करण्याचें काँग्रेस वरिष्ठ ठरवितील काय ? अमृतसर काँग्रेसपुढें हा राज्यपुनर्रचनेचा महत्त्वाचा प्रश्न होता. 'मुंबई महाराष्ट्रांत गेली तर आम्हांस आनंदच होईल. आमचा त्यास विरोध असणार नाहीं ' असे उद्गार मौ. आझाद यांनीं या अधिवेशनांतील भाषणांत काढले ते सूचक मानतां येतील काय ? राज्यपुनर्रचनाविषयक पूर्वी घेतलेल्या निर्णयांत येथें प्रत्यक्ष कांहींच बदल करण्यांत आला नाहीं. पण भारताचें स्थैर्य; एकता व प्रगति घडवून आणण्यासाठीं बहुभाषिक राज्यांचा सिद्धान्त त्यांनीं आतां मांडला असून काँग्रेसनें आजवर पुरस्कारिलेला एकभाषिक राज्याचा सिद्धान्त बदलूं पहात आहेत. पण वस्तुस्थितीशीं निगडित असणारे सिद्धान्त केवळ भावनात्मक प्रतिक्रियांनीं बदलतां येणार नाहींत.

संयुक्तमहाराष्ट्राची गेल्या चार महिन्यांतील ही कहाणी येथें संगतवार देण्याचा प्रयत्न केला आहे. ही कहाणी संपली आहे असें अजून म्हणतां येत नाहीं. किंबहुना मुंबईसह महाराष्ट्राचें राज्य निर्माण होईपर्यंत या कहाणीच्या घटना घडतच रहाणार. पुढील महिन्यांत मुंबईराज्यविधिमंडळांत तसेंच पार्लमेंटमध्यें राज्यपुनर्रचनाविषयक बिल चर्चेस येईल. म्हणून तूर्त ही कहाणी येथेंच थांबविणें इष्ट होईल. या कहाणींतील घटनांशीं ज्या व्यक्ती, संस्था अगर पक्ष यांचा संबंध आला त्यांच्या धोरणाची निर्भीड व वस्तुनिष्ठ चिकित्सा करणें आवश्यक असून ती करण्याचा लेखकाचा मानस आहे. पण ही प्रस्तुत कहाणीच एवढी प्रदीर्घ झाली आहे कीं याच ठिकाणीं ती चिकित्सा आतां करण्यास अवसर नाहीं. व वाचकांना आणखी ताण देणें इष्टहि ठरणार नाहीं. ती पुढील अंकीं एका स्वतंत्र लेखांतच करण्याजें योजिलें आहे.








प्रा. सुरेश म. डोळके

# कै. विद्वद्रत्न डॉ. केशव लक्ष्मण ऊर्फ भाऊजी दप्तरी

रविवार ता. १९ फेब्रुवारी १९५६ रोजीं विद्वद्रत्न डॉ. केशव लक्ष्मण ऊर्फ भाऊजी दप्तरी यांची जीवनयात्रा संपली. एक वर्ष हें जीवन-ग्रंथाचें एक पान मानलें तर भाऊजींच्या जीवनग्रंथाचीं शहात्तर पानें उलटल्यावर – सत्याहत्तरावें पान उलटण्या पूर्वीच – त्यांचा जीवनग्रंथ आटोपला असे म्हणावें लागतें. जीवनाच्या सारीपटावरून काळपुरुषानें त्यांना दूर सारलें !

भाऊजींच्या निर्याणदिनीं भीष्माष्टमी होती. गेलीं चार तपें 'ज्ञानान्मोक्षा'च्या साधनेंत भाऊजींनीं आपल्या जीवनाचा कणन् कण वेंचला. आपल्या तेजस्वी बुद्धीचा उपयोग त्यांनीं लखलखीत अशा खड्गासारखा केला. बुद्धीच्या तरवारीनें वेदांच्या अपौरुषेयत्वापासून तों धर्माच्या परिवर्तनशीलतेपर्यंत आणि भारतीययुद्धाच्या कालनिर्णयापासून तों पंचांगाच्या एकसूत्रीकरणापर्यंत ज्ञानविज्ञानाच्या विविध क्षेत्रांत त्यांनीं पराक्रम गाजविला. शरपंजरीं पडल्यानंतरहि त्यांची बुद्धि शेवटपर्यंत शाबूत होती. ते तर म्हणतहि असत: "ईश्वरानें माझी बुद्धि अजूनहि शाबूत ठेवली ही त्याची माझ्यावर मोठी कृपा आहे. ती शाबूत असेपर्यंत मला जगाची भीति नाहीं."

पराक्रमाच्या दृष्टीनें भाऊजींची तुलना भीष्माचार्यांशींच करितां येईल. भीष्माचार्यांचें उत्तरायणांत ज्या दिवशीं निर्वाण झालें, नेमक्या त्याच तिथीला, उत्तरायणांतच, भाऊजींनींहि आपला प्राण सोडला, हा योगायोगहि किती सूचक आहे !

गेल्या सात महिन्यांपासून भाऊजी अंथरुणाला खिळून होते. रोज संध्याकाळीं मी त्यांच्याकडे जात असें. तास दोन तास त्यांच्याजवळ बसत असें. विविध विषयांवर चर्चा करीत असें. आणि उठतांना 'आतां उद्यां येईन, भाऊजी' असें म्हणून चर्चेनें उद्बोधित झालेल्या पण भाऊजींच्या आजारानें भारावलेल्या अंतःकरणानें त्यांचा निरोप घेत असें. भाऊजीहि हंसून 'ठीक आहे' असें म्हणत. चेहऱ्यावर नेहमींचीच शांत प्रसन्नता, वृत्तींत बालकाची तीच निरागसता, 'ठीक आहे' असें हळु आवाजांत म्हणतांना त्यांतून पलीकडे डोकावूं पाहणारी असहायतेची सूक्ष्म छटा... !

गेल्या सहा महिन्यांत माझ्या या कार्यक्रमांत सहसा खंड पडला नाहीं. आपल्या सूक्ष्म आणि क्रांतिदर्शी प्रतिभेनें ज्ञानविज्ञानाचीं विविध क्षेत्रें उजळून टाकणारा हा ब्रह्मर्षि अगदीं शेवटल्या क्षणापर्यंत आपल्या बुद्धिनिष्ठेंत धुंद होता. या शेवटल्या दुखण्यांत अंथरुणाला खिळल्यावरहि त्यांच्या शब्दाशब्दांत त्यांच्या उग्र आणि एकाग्र बुद्धिनिष्ठेचें तेज, व त्यांच्या ज्ञानप्रतीतीचा सहजोद्रेक ओसंडत असे. गेल्या सात महिन्यांत ॲलोपथीपासून आयुर्वेदापर्यंत वैद्यकाच्या निरनिराळ्या शाखांत निष्णात असलेले अनेक धन्वंतरी त्यांच्याकडे आले. त्यांच्यापैकीं कांहींनीं स्वतःच्या औषधोपचारानें भाऊजींना दुरुस्त करूं असा आत्मविश्वासहि त्यांच्याजवळ व्यक्त केला. पण भाऊजी त्यांना सांगत, "तुम्ही मला कसें दुरुस्त करूं शकतां, हें माझ्या बुद्धीला पटवून द्या." धन्वंतरी युक्तिवाद करीत आणि भाऊजी त्यांना प्रतिप्रश्न विचारून निरुत्तर करीत. स्नेह्यांनीं या बाबतींत आग्रह केला तर ते म्हणत: "त्यांनीं माझ्या बुद्धीला पटवून द्यावं. माझी बुद्धि शाबूत असेपर्यंत माझ्या बुद्धीला न पटणारी कोणतीहि गोष्ट, स्वतःचा जीव वांचविण्याकरतांहि मी कधींच करणार नाहीं." स्नेह्यांनीं अधिकच आग्रह केला तर ते निर्वाणीचें सांगत: "होमिओपथीवर माझा विश्वास आहे. तिच्या प्रतिष्ठेकरितां मी शेवटपर्यंत लढलों. तिचें संगोपन व संवर्धन ही माझी जीवननिष्ठा आहे. मी मेलों तरी चालेल. पण माझ्या जीवननिष्ठेला स्वतःचे प्राण वांचावे म्हणून सुद्धां मी कधींच सोड-



अनुक्रमणिका








णार नाहीं. . . . ''

सुमारें पंधरा दिवसांपूर्वी पुण्याला भरलेल्या साहित्य-ॲकेडेमीच्या बैठकींत भाऊजींचे अप्रकाशित ग्रंथ प्रसिद्ध करावे अशी ॲकेडेमीला विनंति करण्यांत आली. वृत्तपत्रांतून ही बातमी प्रकाशित होतांच त्याच दिवशीं संध्याकाळीं मी ती भाऊजींना सांगितली. भाऊजींनीं ती ऐकली व ''काय तें मला नीट कळलें नाहीं '' एवढेंच त्यावर म्हटलें. मलाहि त्या बातमीचा विशेष बोध होईना. म्हणून मंगळवार ता. १४ फेब्रु० रोजीं मी व माझे स्नेही डॉ. मा. गो. देशमुख असे दोघेहि सौ. कुसुमावतीबाई देशपांडे यांच्याकडे गेलों. बराच वेळ बोलणें झाल्यावर कुसुमावतीबाईनीं साहित्य—ॲकेडेमीकरितां भाऊजींच्या प्रकाशित व अप्रकाशित ग्रंथांची यादी तयार करून देण्याचें काम माझ्यावर सोंपविलें. मीं आनंदानें तें स्वीकारलेंहि.

ही संपूर्ण यादी स्वतः भाऊजींनींच सांगावी अशी माझी इच्छा होती. रोज संध्याकाळीं मी भाऊजींकडे जात होतों, —ही माहिती भाऊजींनाच विचारायची असा निश्चय घेऊन! पण भाऊजींच्या खोलींत पाऊल टाकलें कीं त्यांना ती सांगण्याचा धीर मला होईना. त्यांना कमालीची अशक्तता आली होती. आवाज खोल गेला होता. कुणी कांहीं बोललं तर तें देखील ऐकून घेण्याच्या मन:स्थितींत ते नव्हते. ही आनंदाची बातमीहि आपण भाऊजींना सांगूं शकत नाहीं या विचारानें माझें मन विषण्ण झालें!

१८।२।५६ ला शनिवारीं दुपारीं २ वाजतां त्यांनीं त्यांच्या कुटुंबीयांपैकीं प्रत्येकाला त्याच्या नांवानें हाक मारून जवळ बोलाविलें व अखेरचा निरोप दिला. त्यानंतर त्यांना ताप चढला व तो रविवारीं पहाटेपर्यंत तसाच राहिला. आतां आपण भाऊजींना साहित्य—ॲकेडेमीची बातमी कधींच सांगूं शकणार नाहीं अशी माझ्या मनाची जवळजवळ खात्री झाली. व त्या व्यथित मन:स्थितींतच मी शनिवारीं रात्रीं त्यांच्या घरून परतलों.

शेवटीं रविवारीं सकाळीं निश्चयच केला. आणि ८॥ वाजतां भाऊजींकडे गेलों. ' कोण ? ' म्हणून त्यांनीं खुणेनें विचारतांच मी स्वत:चें नांव सांगितलें. आणि त्यांना कशी स्फूर्ति आली कुणास ठाऊक, त्यांनीं आदल्या रात्रीं पडलेलें एक स्वप्न सांगितलें. आणि त्या स्वप्नाला उद्देशून ते म्हणाले: ' It is ominous. My voice is sinking ...'

त्यानंतर मीं त्यांना साहित्य—ॲकेडेमीची बातमी सविस्तर सांगितली. भाऊजींनीं ती ऐकली. मधून-मधून ते मान हलवीत होते. मीं त्यांना विचारलें: ' तुमच्या ग्रंथांची माहिती सांगतां का, भाऊजी ? ' खुणेनेंच ते ' हो ' म्हणाले. आणि ९ वाजल्यापासून तों १०। वाजेपर्यंत त्यांनीं आपल्या अप्रकाशित व पुनर्मुद्रित करण्याची आवश्यकता असलेल्या ग्रंथांची माहिती विस्तारानें सांगितली. ' माझ्या स्फुट निबंधांचा एक संग्रहहि प्रकाशित करणें राष्ट्राच्या दृष्टीनें अवश्य आहे ' असें ते म्हणाले. कांहीं स्फुट निबंधांची, त्यांचें प्रकाशन-स्थळ व प्रकाशनकाळ यांसह त्यांनीं घडाघड माहिती सांगितली. कागदावरलें टिप्पण वाचावें इतक्या वेगानें ते ही माहिती सांगत होते. त्यांच्या एका निबंधाविषयीं मी मधूनच त्यांना विचारलें, '' हा ' विविधज्ञानविस्तारां'त प्रकाशित झाला होता कां '' ? ते एकदम म्हणाले, '' नाहीं. बडोद्याच्या ' सहविचार ' मासिकांत तो १९२५ सालीं प्रकाशित झाला आहे. '' हें त्यांनीं इतक्या आवेगानें सांगितलें कीं त्यांना जणूं म्हणावयाचें होतें: '' काय विचारायचं असेल तें आतां विचारून घ्या. मी सारं सांगतों . . . ''

कै. शिवराम गणपतराव ऊर्फ दादासाहेब पवार यांच्या ' ग्रहगतिसिद्धान्त ' या ग्रंथाचा उल्लेख करून ते म्हणाले: '' पवारांचा हा ग्रंथ प्रसिद्ध करणें हें माझें नैतिक कर्तव्य आहे. माझ्या ग्रंथांच्या यादींत याहि ग्रंथाचें नांव लिहून घ्या. तो प्रसिद्ध झाल्यानें मला फार आनंद होईल. माझे ग्रंथ










प्रकाशित झाले नाहींत तरी चालेल, पण पवारांचा हा ग्रंथ आधीं प्रकाशित व्हावा अशी माझी इच्छा आहे. ''

सर्व माहिती सांगितल्यावर ते म्हणाले: ''भाऊ-जींचे ग्रंथ प्रकाशित करावे असें म्हणणें ही आज-काल एक फॅशन् झाली आहे. तसें होऊं देऊं नका...''

भाऊजींनीं उच्चारलेलें हेंच शेवटलें वाक्य. बरोबर १०–१५ ला त्यांनीं हें वाक्य उच्चारलें. नंतर त्यांनीं स्वतःच स्वतःची नाडी पाहिली व त्यांनीं स्वतःच सांगितलें : ''नाड्या गेल्या. I am sinking '' या शब्दांपाठोपाठ त्यांच्या तोंडांतून खोल आवाजांत शब्द उमटले ' ग्रं..थ...आ... टो...प...ला...' आणि असे शब्द त्यांच्या तोंडां-तून बाहेर पडतात न पडतात तोंच—

१०–४५ वाजतां त्यांचें प्राणोत्क्रमण झालें !

शनिवारच्या दुपारच्या घटनेकडे पाहिलें कीं वाटतें– जणूं स्वतःच्या ग्रंथांची स्वतः माहिती सांगण्याकरितांच त्यांचे प्राण घोटाळत होते. ती माहिती त्यांनीं सांगितली.

**' ज्ञानान्मोक्षः '**

सत्य-ज्ञान हा भाऊजींचा मोक्ष होता. ' ज्ञाना न्मोक्षः'याची साधना हा त्यांचा आनंद होता. ' त्वं ज्ञानमयो विज्ञानमयोऽसि ' हें जें परमेश्वराचें स्वरूप अथर्वशीर्षांत सांगितलें आहे, तेंच भाऊ-जींनीं प्रमाण मानलें व त्या स्वरूपाच्या उपासनेंत जीवनाची सफलता अनुभविली. ' तपसा ब्रह्म विजि-ज्ञासस्व ' या तैत्तिरीयोपनिषदांतील वचनांत तप हें ज्ञानाचें साधन म्हणून सांगितलें आहे. ज्योति-र्गणित, वेदविद्या, धर्मशास्त्र, भारतीयांचा मौर्यपूर्व इतिहास, वैद्यक वगैरे शास्त्रांच्या स्वतंत्र व मूलगामी अध्ययनाच्या तपश्चर्येंत भाऊजींनीं तपंच्या तपें घालविलीं होतीं. कै. तात्यासाहेब कोल्हटकरांनीं ' एक तपस्वी ज्ञानी पुरुष ' या अभिधेनें भाऊ-जींचा जो गौरव केला होता, तोहि खरोखरी याच भावनेनें !

जगांतला कुठलाहि मोह भाऊजींच्या तपश्चर्येचा भंग करूं शकला नाहीं. किंबहुना, अनेकदां चालून आलेलीं अधिकारपदें व प्रतिष्ठेचे प्रसंग तिरस्कारानें झिडकारून दारिद्र्याचें विरागी जीवन त्यांनीं स्वेच्छेनें स्वीकारलें. भर्तृहरीप्रमाणें भाऊजींना दारिद्र्य हें विद्वा-नांच्या हृदयांतलें शल्य न वाटतां उग्र आणि एकाग्र ज्ञानोपासनेचें स्वाभाविक भूषण वाटत होतें. या स्वेच्छार्जित दारिद्र्यामुळें भाऊजींच्या व्यक्तित्वाला व वाङ्मयाला निःस्पृहतेची व निर्भयतेची प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. 'करण'ग्रंथ लिहवून घेणारे लो. टिळक असोत, अखिलभारतीय ज्योतिष-परिषदेचे अध्यक्ष पं. मदन मोहन मालवीय असोत, येरव-ड्याला अस्पृश्यतानिवारणाची चर्चा करणारे म. गांधी असोत किंवा अ. भा. पंचांग-समितीचे अध्यक्ष डॉ. मेघनाद सहा असोत, आपल्या प्रामा-णिक मतांचें निर्भयतेनें प्रतिपादन करण्यांत भाऊ-जींनीं कोणाच्याहि रागालोभाची पर्वा केली नाहीं. 'ज्ञानान्मोक्षः' च्या साधनेंत मग्न असलेल्या या तप-स्व्यानें सत्यज्ञानाच्या प्रस्थापनेकरितां आणि प्रतिष्ठे-करितां कसल्याहि प्रकारचा त्याग करायचा शिल्लक ठेवला नाहीं.

**ज्ञानप्रतीतीचा सहजोद्रेक**

' ऋतंभरा प्रज्ञे'चें योगशास्त्रांत जें अत्यंत गौर-वानें वर्णन केलेलें आहे, त्या प्रज्ञेचा भाऊजींचें जीवन हा अत्यंत ऋजु व मूर्तिमंत असा आविष्कार होता. ज्ञानाची केवळ उपासना करूनच भाऊजी थांबले नाहींत, तर तपःप्रभावानें प्रतिसृष्टि निर्माण करणाऱ्या विश्वामित्राप्रमाणें, विविध सिद्धान्तांची वा प्रमेयांची प्रतिसृष्टिहि त्यांनीं निर्माण केली. यामुळें '' शबरानें छिन्नभिन्न करून टाकलेलीं ' जैमिनीय सूत्रें ' मीं पुन्हा मूळ स्वरूपांत विद्वानांपुढें ठेवलीं आहेत '', '' शंकराचार्यांनीं व्याससूत्रांचा अर्थ शुद्ध आणि प्रगल्भ बुद्धीनें केला नव्हता '', '' उप-








निषदांचा वस्तुनिष्ठ व बुद्धिप्रत्यायक अर्थ मी माझ्या 'The Realistic and Rationalistic Interpretation of the Upanishads' या ग्रंथांत पहिल्यांदाच करून दाखविला आहे." इत्यादि भाऊजींच्या सहजोद्गारांनाहि आत्मप्रत्ययाचें तेज येई. स्वभावतःच अत्यंत ऋजु आणि शालीन असलेल्या भाऊजींच्या असल्या उद्गारांत स्वतःच्या तीव्र बुद्धिमत्तेचा उन्माद नाहीं, इतरांना अवमानणारी तुच्छताहि नाहीं, तर ज्ञानप्रतीतीचा सहजोद्रेक आहे, तत्त्वनिष्ठुर आत्मप्रत्ययाचा साक्षात्कार आहे. शंकराचार्यांबद्दल बोलतांना गेल्याच महिन्यांत ते मला म्हणाले होते : "शंकराचार्यांनीं 'ब्रह्मसूत्रां-' वरील आपला भाष्यग्रंथ ज्ञानाच्या प्रगल्भावस्थेंत लिहिला नसावा. त्यांना आयुष्यच फार थोडें लाभलें होतें. त्यांची बुद्धि अत्यंत तीव्र होती. चिंतनानें त्यांच्या बुद्धीला प्रगल्भता आली असती तर त्यांनीं व्याससूत्रांचा असा अर्थ केला नसता."

### भाऊजींच्या वाङ्मयाची स्फूर्ति : मानवता

भाऊजींचें व्यक्तित्व तेजस्वी असलें तरी हिऱ्यासारखें रूक्ष नव्हतें. चंद्रकान्त-मण्यासारखें पाझरणारें होतें. त्यांच्या लोकोत्तर बुद्धिमत्तेला मानवतेची असामान्य जोड मिळाली होती. किंबहुना, भाऊजींच्या सर्व वाङ्मयाची स्फूर्तिच मुळीं त्यांच्या मानवतेवरील निष्ठेंत होती असें मला वाटतें. भाऊजी धर्मशास्त्राच्या अभ्यासाकडे वळावयाला त्यांची ही मानवताच कारणीभूत झाली. बंगालच्या फाळणींतून उद्भवलेली देशाभिमानाची प्रचंड लाट व तिच्यामुळें झालेली राजकीय जागृति एकदम ओसरलेली पाहून खरा 'धर्म' काय आहे हें लोकांना सांगण्याची भाऊजींना आवश्यकता वाटली, व म्हणून ते धर्मग्रंथांच्या अभ्यासाकडे वळले. मानवतेवर भाऊजींची खूप निष्ठा होती. ती नसती तर धर्म परिवर्तनीय आहे असें क्रांतिकारक मत त्यांना प्रतिपादन करतां आलें नसतें, इहलोकीं म्हणजे मरणापूर्वीच आत्यंतिक सुखाची प्राप्ति करून देणें हेंच धर्माचें खरें रहस्य होय, अशी जीवननिष्ठा त्यांना व्यक्त करतां आली नसती आणि कर्मसंन्यासाचें खूळ माजविणाऱ्या बुद्धावर व शंकराचार्यांवर 'बुद्धिवादाच्या भूमिकेवरून' त्यांना तुटूनहि पडतां आलें नसतें. वेदप्रामाण्यापेक्षां बुद्धिप्रामाण्याचें महत्त्व अधिक मानण्यांत त्यांच्यांत असलेली मानवतेची ही मूलप्रेरणाच अधिक प्रभावी आहे, असें मला वाटतें.

भाऊजींच्या वैद्यकीय ग्रंथांकडे पाहिलें तरी हेंच दिसून येईल. क्रोमोपथी, ॲलोपथी, हायड्रोपथी, आयुर्वेद इत्यादि वैद्यक-शास्त्रांचा भाऊजींनीं सांगोपांग व मूलगामी अभ्यास केला. आणि रोग्याला नैसर्गिकपणें रोगमुक्त होतां येईल व हिंदुस्थानच्या आरोग्याचा प्रश्न सुलभ रीतीनें सोडवितां येईल अशी खरी चिकित्सापद्धति कोणती हेंहि आपल्या शोधक बुद्धीच्या प्रकाशकिरणांनीं त्यांनीं निश्चित केलें.

गरीबांना पाहून भाऊजींचें अंतःकरण कळवळत असें. एकनाथांना आपण भूतदयावादी म्हणतों— स्वतःच्या घरचें श्राद्धान्न त्यांनीं ब्राह्मणांपूर्वी महारांना जेवूं घातलें होतें म्हणून ! भाऊजींच्याहि जीवनांत अशी एक आठवण आहेः लग्नाच्या मुख्य पंक्तींत पाहुण्यांच्या आधीं भिकारणीला जेवूं घातल्याची ! भाऊजींच्या घरीं एका लग्नप्रसंगीं मुख्य पंक्तीची तयारी चालू होती. तितक्यांत एक भिकारीण भुकेनें कळवळून दारांत विव्हळूं लागली. तेव्हां भाऊजी तिला म्हणाले : "काय, तुला अगदींच थांबवत नाहीं ? मग जेवतेस का ?" आणि खरोखरींच त्यांनीं तिला एकटीलाच भरलेल्या पानावर, पाहुण्यांच्या आधींच, जेवायला बसविलें ! एकनाथमहाराजांची सहृदयता झाली तरी ती यापेक्षां वेगळी कोणती असणार !

मानवतेच्या या मूलप्रेरणेनेंच भाऊजी अलिकडे समाजवादी झाले होते. समाजवादी पक्षाचे ते सभासद झाले होते असें नाहीं. त्यांचा समाजवाद वेगळाच होता—मानवतेच्या अधिक जवळचा !



अनुक्रमणिका






" भक्ताहून भिन्न आणि भक्ताची इच्छा पुरविण्याकरितां आपल्याच जगाचें नियमन करणाऱ्या नियमांचा भंग करणारा असा ईश्वर कोणाहि बुद्धिमान् मनुष्यास मान्य होणार नाहीं व आम्हांसहि मान्य नाहीं. " [धर्म-विवाद-स्वरूप, पृ.२५१] या भाऊजींच्या खणखणीत घोषणेच्या मुळाशीं भक्ताचा भाव आहे, जीवनावरचें प्रेम आहे आणि मानवतेवरली निष्ठाहि आहे.

भाऊजींच्या मानवतेवरल्या या निष्ठेमुळेंच सानेगुरुजीहि भाऊजींना खूप मानीत असावे. १९४९ सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या ४, ५ तारखेला नागपूर महाविद्यालयांतल्या शारदा-मंडळाच्या रौप्य-महोत्सवाकरितां सानेगुरुजी नागपूरला आले होते. समाजवादी-पक्षातर्फें त्यांचें येथील नगरभवनांत जाहीर व्याख्यान होतें. स्नेह्यांच्या आग्रहावरून भाऊजीहि त्या व्याख्यानाला हजर राहिले. सानेगुरुजी आधींच येऊन बसले होते. भाऊजी येतांना पाहतांच गुरुजी खुर्चीवरून उठले आणि भाऊजींच्या पायांवर मस्तक ठेवून त्यांनीं त्यांना वंदन केलें.

लो. टिळक व पुण्याची ' पंचांगप्रवर्तक-कमिटी ' यांच्या आदेशावरून भाऊजींनीं लिहिलेल्या ' करण-कल्पलता ' या ग्रंथानें भाऊजींची कीर्ति साऱ्या भारतांत पसरविली. लो. टिळकांच्या मनांत शुद्ध पंचांग प्रचलित करण्याविषयी फार कळकळ होती. मंडालेहून परत आल्यानंतर व त्याकरितां त्यांनी पुण्याला एक व सांगलीला एक अशीं दोन ज्योतिष-संमेलनें भरविलीं. सांगलीच्या संमेलनांत ज्यावरून शुद्ध पंचांगाचें गणित थोड्या श्रमांत सूक्ष्मपणानें करतां येईल असा एक करणग्रंथ तयार करण्याचें ठरलें व तसा ग्रंथ करून देणारास १००० रु. बक्षीस देऊं असेंहि टिळकांनी ' केसरी 'तून जाहीर केलें. तेव्हां कै. तात्यासाहेब कोल्हटकरांनी स्मरणपूर्वक भाऊजींचें नांव टिळकांना सुचविलें व टिळकांच्या आदेशावरून भाऊजींनी ' करणकल्पलता ' तयार करून १००० रु. चें बक्षीसहि मिळविलें. हा ग्रंथ १०।१।१९२५ रोजीं ' केसरी 'नें प्रकाशित केला.

स्वतःच्या ग्रंथासंबंधीं मतप्रदर्शन करतांना ते म्हणत–
" ' करणकल्पलता ' या ग्रंथाची योग्यता लोकांस वाटते तशी मला वाटत नाहीं. मी माझ्या सर्व ग्रंथांत त्याची योग्यता कमी समजतों. हा ग्रंथ करण्याकरितां श्रम व वेळ फार लागला व बुद्धिहि फार खर्च झाली; तरी हा दुय्यम प्रतीचा ग्रंथ आहे. कारण यांत नवीन असें कांहींच नाहीं. जुन्याचाच अनुवाद आहे. नावीन्य व उपयुक्तता या दृष्टीनें ' धर्मरहस्य ', ' धर्मविवादस्वरूप ' व ' जैमिन्यर्थ-दीपिका ' हे ग्रंथ श्रेष्ठ. ' चिकित्सापरीक्षण ' व ' सच्चिकित्सा-प्रकाशिका ' त्याहून कमी. ' भारतीय युद्धकालनिर्णय ' व ' वैदिक कालगणनापद्धति ' त्याहूनहि कमी, ' भारतीय ज्योतिःशास्त्रनिरीक्षण ' त्याहूनहि कमी. आणि ' करणकल्पलता ' सर्वांत कमी असें मीं मानतों. लोक ह्याच्या अगदीं उलट समजतात हें आश्चर्य आहे. "

## अप्रकाशित ग्रंथ

भाऊजींचे अनेक ग्रंथ अप्रकाशित आहेत. त्या सर्वांत The Realistic and the Rationalistic Interpretation of the Upanishads' या इंग्रजी ग्रंथाला ते सर्वांत जास्त महत्त्व देत होते. भाऊजींच्या उग्र आणि एकाग्र ज्ञानोपासनेनें लुब्ध होऊन नागपूर विद्यापीठानें त्यांना पंचवीस वर्षांपूर्वी डी. लिट्. ही बहुमानाची पदवी स्वयंस्फूर्तीनें दिली व स्वतःला पुनीत आणि भूषित करून घेतलें. भाऊजींचा एक एक ग्रंथ, कुठल्याहि विद्यापीठानें स्वयंस्फूर्तीनें त्यांना डी. लिट्. ही पदवी द्यावी अशा योग्यतेचा आहे.








# ' नवभारत ' निधि

## -- विनंति --

' नवभारत ' मासिक पुढें चालू रहावें, त्याची कार्यक्षमता वाढावी, या दृष्टीनें त्यास कांहीं आर्थिक स्थैर्य लाभावें याकरितां किमान पन्नासहजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां जें एक विनंति-पत्रक प्रसिद्ध झालें तें विदितच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५वर सह्या असून सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, डॉ. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. वा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिंदु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

' नवभारत'निधि पुढें येतें वर्ष चालू रहाणार आहे. मूळ विनंतिपत्रकांतील विनंतीस मान देऊन 'नवभारत'-निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, अशी आमची प्रार्थना आहे. ' नवभारत '-निधीस १०० रु. ची देणगी देणारास ' नवभारत ' मासिक दहा वर्षें मिळत राहील.

' नवभारत ' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें व पोहोंच ' नवभारता 'च्या दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

' नवभारता'च्या गेल्या म्हणजे फेब्रुवारी १९५६ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा पुढें दिल्या आहेत :

| | |
|---|---|
| डॉ. वाय्. बी. दामले (पुणें) (दुसरा हप्ता) | ५०-०-० |
| श्री. मु. रा. दामले (मुंबई) (दुसरा हप्ता) | ५०-०-० |
| श्री. दत्तु गोरे ( पुणें ) | २-०-० |
| | १०२-०-० |
| मागील शिल्लक | ४८२१-५-३ |
| एकूण | ४९२३-५-३ |

' नवभारत'निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमलेली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख. प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर ( खजिनदार ), श्री. कृ. ना. फडके व श्री. मा. प. मंगुडकर ( संयुक्त कार्यवाह ).

' नवभारत ' निधिसमितीचें कार्यालय " C/o 'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४" येथें आहे. देणग्या, " खजिनदार ' नवभारत ' निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर पुणें ४ " या पत्त्यावर पाठवाव्यात अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** (अध्यक्ष)

२५।२।१९५६ **कृ. ना. फडके** } कार्यवाह

पुणें ४ **मा. प. मंगुडकर** }






